# महाराष्ट्र विधानपरिषद

## पहिले (अर्थसंकल्प) अधिवेशन, २०१८

## अतारांकित प्रश्नोत्तरांची यादी

**प्रश्नांची एकूण संख्या - ५०**

**उच्च माध्यमिक विभागातील पायाभूतपेक्षा वाढीव पदांना मान्यता देण्याबाबत**

**(१) ८४६ (२१-०१-२०१५). श्री.नागोराव गाणार, डॉ.अपूर्व हिरे :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) उच्च माध्यमिक विभागातील शासन मान्य अनुदानित संस्थांमधील सुमारे ९२६ पदांना शासनाने दिनांक २२ एप्रिल, २०१४ च्या आदेशानुसार मान्यता दिली आहे, हे खरे आहे काय,

(२) ९२६ पदे २००३-०४ ते २०१०-११ या वर्षातील असून हया शिक्षकांना केंव्हापासून वेतन अनुदान देण्यात आले आहे,

(३) नसल्यास, मंजूर पदांना अनुदान न देण्याची कारणे काय आहेत,

(४) सन २०११-१२ ते २०१३-१४ मधील उच्च माध्यमिकची पायाभूतपेक्षा वाढीव पदांची संख्या किती आहे,

(५) सदर पदांचा प्रस्ताव शासनास केंव्हा प्राप्त झाला आहे ?

**श्री.विनोद तावडे (२१-०२-२०१८) :** (१) होय, हे खरे आहे.
(२) व (३) पात्र ठरलेल्या ३३६ शिक्षकांना दिनांक ०५/०२/२०१६ व ३०/०३/२०१६ च्या शासन निर्णयान्वये वेतन अनुदान सुरु करण्यात आले आहे.
(४) व (५) वाढीव पदांसाठीचा प्रस्ताव शासनास संचालक माध्यमिक यांच्या दिनांक १९/०५/२०१४ च्या पत्रान्वये शासनास प्राप्त झाला, तपासणी अंती २६१ वाढीव पदांचा सुधारीत प्रस्ताव दिनांक २८/०४/२०१७ रोजीच्या पत्रान्वये शासनास प्राप्त झाला आहे.

---

**मौजे कोंडये (ता.संगमेश्वर, जि.रत्नागिरी) येथील शाळा व्दिशिक्षकी असताना एकच शिक्षक असल्याबाबत**

**(२) ५१४९ (०५-०५-२०१०). श्री.विक्रम काळे :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मौजे कोंडये (ता.संगमेश्वर, जि.रत्नागिरी) येथील शाळा व्दिशिक्षकी असताना तेथे सन २००७ पासून एकच शिक्षक असल्याने दिनांक १५ जानेवारी, २०१० रोजी तहसिलदार यांना ग्रामस्थांनी घेराव घालून मोर्चा काढण्याचा इशारा दिला, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनामार्फत चौकशी केली आहे काय,
(३) असल्यास, सदर प्रत्येक शाळेला पुरेशा प्रमाणात शिक्षक पुरविणेबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१२-०१-२०१८) :** (१) हे खरे नाही.
(२) प्रश्न उद्‌भवत नाही.
(३) शा.नि. दिनांक २८/०८/२०१५ अन्वये नवीन शाळा सुरु करणे, वर्ग जोडणे त्या अनुषंगाने शाळांमधील संरचनात्मक बदल करणे आणि संचमान्यता करणे याबाबत सुधारित निकष विहित करण्यात आलेले आहेत.

---

## राज्यातील आदिवासी भागातील विद्यार्थ्यांना प्रवास खर्च देण्याबाबत

**(३) १२५१४ (२३-१२-२०१५). श्री.रामराव वडकुते, श्री.ख्वाजा बेग, श्रीमती विद्या चव्हाण, श्री.किरण पावसकर, श्री.नरेंद्र पाटील, श्री.सतिश चव्हाण :** सन्माननीय **आदिवासी विकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील आदिवासी भागातील विद्यार्थ्यांना शाळेत जाण्याचा प्रवास खर्च परवडत नसल्याने विद्यार्थ्यांचे शाळेतील गळतीचे प्रमाण वाढले असल्याचे माहे ऑगस्ट, २०१५ च्या तिसऱ्या सप्ताहात निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनामार्फत पाहणी केली आहे काय,

(३) असल्यास, पाहणीचे निष्कर्ष काय आहेत व तद्नुसार आदिवासी विद्यार्थ्यांचे गळतीचे प्रमाण कमी करणेबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे ?

**श्री.विष्णु सवरा (१५-०२-२०१८) :** (१) हे खरे नाही.

(२) व (३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## मुंबईत सेट टॉप बॉक्स नसणाऱ्या टिव्हीवर सिग्नल बंद करण्याबाबत

**(४) १६९४३ (२७-०४-२०१६). श्री.संजय दत्त, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.शरद रणपिसे :** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबईत सेट टॉप बॉक्स नसणाऱ्या ९ लाख टिव्हीवर सिग्नल बंद करण्याचे शासनाने निर्णय घेतला असल्याचे माहे जानेवारी, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, या निर्णयाची अंमलबजावणी करण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (२४-०१-२०१८) :** (१) व (२) केंद्र शासनाच्या माहिती व प्रसारण मंत्रालयाच्या दिनांक ११ नोव्हेंबर, २०११ व दिनांक २१ जून, २०१२ च्या अधिसूचनेनुसार निर्धारीत करण्यात आलेल्या केबल डिजीटायझेशन फेज-१ (PHASE-I) या कार्यक्रमांतर्गत बृहन्मुंबई महानगरपालिकेच्या क्षेत्रामध्ये दिनांक ३१/१०/२०१२ च्या मध्यरात्रीपासून केबल टेलीव्हिजनचे कार्यक्रम फक्त डिजीटल अॅड्रेसेबल पध्दतीनुसार प्रक्षेपित किंवा पुन:प्रक्षेपित करणे प्रत्येक केबल चालकांवर बंधनकारक करण्यात आलेले आहे. त्यानुसार, दिनांक ३१/१०/२०१२ च्या मध्यरात्रीपासून बृहन्मुंबई महानगरपालिकेच्या क्षेत्रामध्ये केबल टि.व्ही. जोडण्यांकरीता सेट टॉप बॉक्स अनिवार्य करण्यात आले आहे.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## मुंबईतील मैदानांवर खेळाडूंकरिता आवश्यक मुलभूत सुविधा पुरविण्याबाबत

**(५) १९९२० (२३-०८-२०१६). श्री.विजय ऊर्फ भाई गिरकर :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मुंबईतील आझाद मैदान, ओव्हन मैदान, शिवाजी पार्क आणि दडकर मैदान या नामांकित मैदानांवर खेळण्यासाठी येणाऱ्या शालेय व महाविद्यालयीन खेळाडूंसाठी पिण्यासाठी पाणी, विश्रांतीसाठी शेड, शौचालये अशा आवश्यक मुलभूत सुविधांचा अभाव असल्याचे निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, काही ठिकाणी सरावासाठी भाडे आकारले जाते, भाडे देऊन देखील खेळाडू व संघांना आवश्यक सुविधा पुरविल्या जात नाहीत यामुळे खेळाडू, संघ, क्लब यांचे नुकसान होत आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करून कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०१-०२-२०१८) :** (१) हे खरे नाही.

(२) शिवाजी पार्क मैदान हे सर्वांसाठी खुले असून, कोणत्याही खेळाडूकडून कोणत्याही प्रकारचे भाडे घेतले जात नाही.

दडकर मैदानात सरावासाठीचे भाडे बृहन्मुंबई महानगरपालिकेकडून आकारण्यात येत नाही.

(३) व (४) प्रश्न उद्भवत नाही.

---

**वसई-विरार महानगरपालिकेने अपंगाकरिता राखीव असलेल्या मांडवी आठवडे बाजाराचा ठेका अपंगाला न दिल्याबाबत**

**(६) २१६८९ (२३-०८-२०१६). श्री.धनंजय मुंडे, श्री.सुनिल तटकरे, श्री.हेमंत टकले, श्री.आनंद ठाकूर, ॲड.निरंजन डावखरे : तारांकित प्रश्न क्रमांक १९१७४ ला दिनांक ६ एप्रिल, २०१६ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) वसई-विरार महानगरपालिकेने अपंगाकरिता राखीव असताना मांडवी आठवडी बाजाराचा ठेका अपंगाला दिलेला नाही तसेच सदर ठेका ई-निविदेद्वारे दिला असल्याचे निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, याप्रकरणी जिल्हाधिकारी, पालघर यांना चौकशी करुन अहवाल सादर करण्याचा सूचना देण्यात आल्या होत्या, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, सदर अहवाल शासनास प्राप्त झाला आहे काय, तद्नुसार काय कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०६-०२-२०१८) :** (१) व (२) सन २०१५-१६ करीता वसई-विरार शहर महानगरपालिकेने अपंगासाठी आरक्षित असलेल्या मांडवी आठवडे बाजाराकरीता बाजार कर वसुली ठेका देण्यासाठी निविदा प्रक्रिया तीन वेळा करण्यात येऊनही कोणतीही अपंग संस्था अथवा अपंग व्यक्तीने सदरच्या ई-निविदा प्रक्रियेत सहभाग घेतला नाही.

दरम्यानच्या कालावधीत महानगरपालिकेची सार्वत्रिक निवडणूक सुरू असल्याने सन २०१४-१५ च्या असलेला बाजार कर वसुलीच्या ठेक्यातील रकमेत १०% वाढ करुन पुढील प्रक्रिया होईपर्यंत मुदतवाढ देण्यात आली व बाजार वसुली रक्कम याप्रमाणे वसुल करण्यात आली.

तसेच सन २०१६-१७ करीता चार वेळा ई-निविदा प्रसिध्दी करण्यात आली. परंतु चारही वेळेस अपंग व्यक्ती अथवा संस्थाकडून निविदा प्राप्त झाल्या नाहीत. मात्र पाचव्या वेळेस जाहीर ई-निविदा प्रसिध्द केली असता श्री.शाहिद मेहबुब सैय्यद (अपंग व्यक्ती) यांची निविदा प्राप्त झाली आहे.

सदर निविदेची तांत्रिक छाननी प्रभाग कार्यालयामार्फत करण्यात येत असल्याने व १०% वाढ करुन मुदतवाढ दिलेल्या ठेकेदाराकडूनच बाजार वसूली करण्यात येत असल्याने तसेच शासनाच्या खरेदी धोरणानुसार कार्यवाही करण्यात आली असल्याचे आयुक्त, वसई विरार शहर महानगरपालिका यांनी कळविले आहे.

(३) व (४) याप्रकरणी चौकशी करुन अहवाल सादर करण्याच्या सूचना दिनांक ३१/०३/२०१६ जिल्हाधिकारी, पालघर यांना देण्यात आल्या होत्या.

तद्नुषंगाने जिल्हाधिकारी, पालघर यांचा प्राप्त झाला असून सदर अहवालाच्या अनुषंगाने शासनस्तरावर कार्यवाही सुरू आहे.

---

## मौजे बाळापूर (ता.जि.बीड) व आकडे (जि.सातारा) गावात विजेचा शॉक लागून मृत्यू झाल्याची घटना

**(७) २२७७४ (१६-०८-२०१६). श्री.हेमंत टकले, श्री.आनंद ठाकूर, श्री.किरण पावसकर,श्री.सतिश चव्हाण, श्री.नरेंद्र पाटील, श्री.सुनिल तटकरे :** सन्माननीय **ऊर्जा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मौजे बाळापूर (ता.जि.बीड) येथे घरांमध्ये असलेल्या मीटरमधील वायरचा प्रवाह कपडे वाळत घालण्यासाठी बांधलेल्या लोखंडी तारेत उतरल्याने सदर तारेस स्पर्श झाल्याने विजेचा शॉक लागून एकाच कुटूंबातील वडिलांसह दोन मुलांचा मृत्यू झाल्याची घटना माहे जून, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान घडली, हे खरे आहे काय,

(२) तसेच सातारा जिल्ह्यातील आकडे गावांत विजेच्या धक्क्याने दोन शेतकऱ्यांना मृत्यू झाल्याची घटना दिनांक ११ जून, २०१६ रोजी घडली, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व तद्नुसार विजेच्या धक्क्याने मृत्यू झालेल्या कुटुंबियांना मदत करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रशेखर बावनकुळे (२०-०२-२०१८) :** (१) हे खरे आहे.

(२) हे खरे नाही.

(३) उपरोक्त दोन्ही प्रकरणी विद्युत निरीक्षक कार्यालयामार्फत चौकशी करण्यात आली आहे. पहिल्या घटनेमध्ये कपडे वाळत घालण्यासाठी वापरलेली जी.आय. वायर व सर्विस वायरच्या आधारासाठी वापरलेली जी.आय. वायर यांचा सर्विस वायरच्या उघड्या जॉईंटशी संपर्क आल्याने जी.आय. वायर विद्युत भारीत झाली व तिच्या संपर्कात एकाच कुटुंबातील वडील व दोन मुलांचा मृत्यू झाला. त्यांच्या नजीकच्या नातेवाईकास प्रत्येकी रुपये २०,०००/- असे एकूण रुपये ६०,०००/- तात्काळ आर्थिक मदत म्हणून म.रा.वि.वि. कंपनीने अदा केली आहे.

दुसऱ्या घटनेमध्ये कै.शरद शिंदे व कै.भास्कर गुजाले हे श्री.मोहन नलवडे यांच्या शेतात मशागतीचे काम करण्यासाठी गेले असता त्यावेळेस शेतात पडलेली टी.व्ही. केबलची वायर व सर्विस वायरच्या उघड्या जॉईंटच्या संपर्कात आल्याने विद्युत भारित जी. आय. वायर (आधाराला जोडलेली) उचलताना विजेचा धक्का लागून प्राणांतिक अपघात घडला आहे.

सदर अपघातात मृत्यू झालेल्या शेतकऱ्यांच्या वारसदारांना महावितरण कंपनीच्या नियमानूसार तातडीची मदत प्रत्येकी रुपये २०,०००/- दिनांक ३०/०६/२०१६ रोजी अदा करण्यात आली आहे. उर्वरित नुकसान भरपाईची रक्कम महावितरण कंपनीच्या नियमानुसार अदा करण्याची कार्यवाही सुरु आहे.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## आय.ए.एस आणि आय.पी.एस अधिकारी दोन ठिकाणावरील शासकीय निवासस्थानांचा लाभ घेत असल्याबाबत

**(८) २५७३२ (०४-०१-२०१७). श्रीमती विद्या चव्हाण, श्री.किरण पावसकर, श्री.हेमंत टकले :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय:-

(१) मुंबईच्या बाहेर बदली झाल्यानंतरही काही आय.ए.एस आणि आय.पी.एस अधिकारी मुंबईतील निवासस्थानासहित बदलीच्या ठिकाणीही शासकीय निवासस्थानांचा लाभ घेत असल्याचे दिनांक ३ ऑक्टोबर, २०१६ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, याची शासनाने चौकशी केली आहे काय, त्यात अशा अधिकाऱ्यांची पदे आणि नावे काय आहेत,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२९-०१-२०१८) :** (१), (२) व (३) आय.ए.एस. व आय.पी.एस. अधिकाऱ्यांची मुंबई बाहेर बदली होऊनही त्यांनी मुंबईतील निवासस्थानासहीत बदलीच्या ठिकाणीही शासकीय निवासस्थानांचा लाभ घेतला आहे त्यांची नावे, सध्याचे पदनाम, मुंबईतील शासकीय निवासस्थान न सोडण्याची कारणे तसेच त्यांचेवर चालू असलेली कारवाई इत्यादीची माहिती सोबतच्या विवरणपत्र “अ” मध्ये देण्यात आली आहेत.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

प्रपत्र-अ

आय.ए.एस. अधिकाऱ्यांबाबतची माहिती

| अ.क्र. | अधिकाऱ्यांचे नाव व सध्याचे पदनाम | कारण |
|---|---|---|
| १. | श्री.डी.टी.वाघमारे, सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग | श्री.वाघमारे हे बृहन्मुंबईत कार्यरत असताना त्यांची आयुक्त, पिंपरी चिंचवड महानगरपालिका येथे बदली झाली होती. सदर ठिकाणी ते दिनांक ०३/०५/२०१६ रोजी रुजू झाले. त्यांना दिनांक २८/०९/२०१६ च्या |

| | | |
|---|---|---|
| | | पत्रान्वये दिनांक ०३/०५/२०१६ ते ०२/०५/२०१७ या कालावधीकरीता नियमित दराने भाडे आकारणी करुन शासकीय निवासस्थानात राहण्यास परवानगी देण्यात आली होती. त्यानंतर ते दिनांक २७/०४/२०१७ पासून पुन्हा बृहन्मुंबईत रुजू झाल्याने त्यांना दिनांक ०९/०८/२०१७ च्या पत्रान्वये शासकीय सेवेत असेपर्यंत किंवा बृहन्मुंबईत कार्यरत असेपर्यंत यापैकी आधीच्या दिनांकापर्यंत ते वास्तव्य करीत असलेल्या बृहन्मुंबईतील शासकीय निवासस्थानात राहण्यास परवानगी देण्यात आली आहे. |
| २. | श्री.के.डी.निंबाळकर, जिल्हाधिकारी,जळगाव | श्री.निंबाळकर हे बृहन्मुंबईत कार्यरत असताना त्यांची मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, ठाणे या पदावर बदली झाली. सदर पदावर ते दिनांक ०२/०६/२०१६ रोजी रुजू झाले होते. सद्या ते जिल्हाधिकारी,जळगाव या पदावर कार्यरत आहेत. बृहन्मुंबई बाहेर बदली झाली असतानाही बृहन्मुंबईतील शासकीय निवासस्थान रिक्त न केल्याने/मुदतवाढ न घेतल्याने कार्यकारी अभियंता, इलाखा शहर विभाग, सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई यांनी नियमानुसार भाडे भरुन शासकीय निवासस्थान रिक्त करण्याबाबत श्री.निंबाळकर यांना दिनांक २२/११/२०१७ अन्वये नोटीस दिली आहे. |

| | | |
|---|---|---|
| ३. | श्री.आर.बी.देशमुख, जिल्हाधिकारी, यवतमाळ | श्री.देशमुख हे बृहन्मुंबईत कार्यरत असताना त्यांची मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सातारा या पदावर बदली झाली. सदर पदावर ते दनिांक ०२/०६/२०१६ रोजी रुजू झाले होते. सद्या ते जिल्हाधिकारी,यवतमाळ या पदावर कार्यरत आहेत. बृहन्मुंबई बाहेर बदली झाली असतानाही त्यांनी बृहन्मुंबईतील शासकीय निवासस्थान रिक्त न केल्याने/मुदतवाढ न घेतल्याने उप अभियंता,बांधकाम (सा.बां.) उपविभाग क्र. १, वरळी यांनी दिनांक १५/१२/२०१७ अन्वये तसेच कार्यकारी अभियंता, मध्य मुंबई (सा.बां.) विभाग, वरळी यांनी दिनांक १९/१२/२०१७ अन्वये नोटीस पाठवून निवासस्थान रिक्त करण्याबाबत सूचित केले आहे. |
| ४. | श्री.आर.जे.नार्वेकर,सह सचिव, | मुख्यमंत्री कार्यालय श्री.नार्वेकर हे बृहन्मुंबईत कार्यरत असताना त्यांची मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, रायगड या पदावर बदली झाली. सदर पदावर ते दिनांक ०८/०९/२०१६ रोजी रुजू झाले होते. सद्या ते मुख्यमंत्री कार्यालयात सह सचिव या पदावर कार्यरत आहेत. बृहन्मुंबई बाहेर बदली झाली असतानाही बृहन्मुंबईतील शासकीय निवासस्थान रिक्त न केल्याने/शासकीय निवासस्थान ताब्यात ठेवण्यास मुदतवाढ न घेतल्याने कार्यकारी अभियंता, इलाखा शहर विभाग (सा.बां.वि.), मुंबई यांनी दिनांक १२/१२/२०१७ अन्वये त्यांना नोटीस दिली आहे. |

| | | |
|---|---|---|
| ५. | श्री.एम.पी.शंभरकर, आयुक्त, समाजकल्याण, पुणे | श्री.शंभरकर हे बृहन्मुंबईत कार्यरत असताना त्यांची मुख्य कार्यकारी अधिकारी, नाशिक या पदावर बदली झाली होती. सदर ठिकाणी ते दिनांक २४/११/२०१५ रोजी रुजू झाले झाले. त्यांची आदिवासी क्षेत्रात बदली झाली असल्याने सामान्य प्रशासन विभागाच्या शासन निर्णय क्र.टिआरएफ २०००/प्र.क्र.३/१२, दिनांक ०६/०८/२००२ मधील तरतूदीनुसार त्यांना दिनांक २०/११/२०१५ ते १९/११/२०१८ पर्यंत किंवा आदिवासी क्षेत्रात कार्यरत असेपर्यंत यापैकी जो कमी असेल त्या कालावधीकरीता नियमित दराने भाडे आकारुन शासकीय निवासस्थानात राहण्यास दिनांक ०८/०८/२०१६ च्या पत्रान्वये मुदतवाढ देण्यात आली होती. त्यानंतर ते दिनांक ०१/०६/२०१७ पासून आयुक्त, समाजकल्याण, पुणे या पदावर रुजू झाल्यानंतर त्यांना दिनांक ०२/११/२०१७ च्या पत्रान्वये नियमित दराने भाडे भरुन एप्रिल, २०१८ पर्यंत मुंबईतील शासकीय निवासस्थानात राहण्यास मुदतवाढ देण्यात आली आहे. |
| ६. | श्री. ए. पी. विधळे, सह सचिव, उद्योग ऊर्जा व कामगार विभाग. | श्री.विधळे हे बृहन्मुंबईत कार्यरत असताना त्यांची मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, अकोला या पदावर बदली झाली होती. सदर ठिकाणी ते दिनांक ०९/०६/२०१६ रोजी रुजू झाले. त्यानंतर त्यांची दिनांक २८/०४/२०१७ पासून पुन्हा बृहन्मुंबईत नियुक्ती झाल्याने दिनांक |

| | | |
|---|---|---|
| | | २८/०४/२०१७ पासून बृहन्मुंबईत कार्यरत असेपर्यंत किंवा शासकीय सेवेत असेपर्यंत यापैकी जो आधीचा दिनांक असेल तोपर्यंत ते वास्तव्य करीत असलेले मुंबईतील शासकीय निवासस्थान दिनांक २२/०६/२०१७ च्या पत्रान्वये त्यांचे नावे नियमित वाटप करण्यात आले असून दिनांक ०९/०६/२०१६ ते २७/०४/२०१७ या कालावधीकरीता नियमानुसार भाडे भरण्याबाबत त्यांना कळविण्यात आले. त्यानुषंगाने त्यांनी दिनांक १४/०७/२०१७ च्या पत्रान्वये सदर कालावधीचे भाडे कार्यकारी अभियंता, इलाखा शहर, मुंबई यांचेकडे भरणा केल्याबाबत कळविले आहे. |
| ७. | श्री.जे.पी.गुप्ता, सचिव, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण विभाग | श्री.गुप्ता हे बृहन्मुंबईत कार्यरत असताना त्यांची विभागीय आयुक्त, अमरावती या पदावर बदली झाली होती. सदर पदावर ते दिनांक १०/०८/२०१६ रोजी रुजू झाले. त्यानंतर ते दिनांक २३/०६/२०१७ पासून पुन्हा बृहन्मुंबईत नियुक्ती झाल्याने बृहन्मुंबईत कार्यरत असेपर्यंत किंवा शासकीय सेवेत असेपर्यंत यापैकी जो आधीचा दिनांक असेल तोपर्यंत ते वास्तव्य करीत असलेले निवासस्थान दिनांक १८/०७/२०१७ च्या पत्रान्वये त्यांचे नावे नियमित करण्यात आले असून दिनांक १०/०८/२०१६ ते २२/०६/२०१७ या कालावधीकरीता नियमानुसार भाडे भरण्याबाबत त्यांना सूचित करण्यात आले आहे. |

आय.पी.एस. अधिकाऱ्यांबाबतची माहिती

| अ.क्र. | अधिकाऱ्यांचे नाव | कारण |
|---|---|---|
| १. | श्रीमती रश्मी शुक्ला, पोलीस आयुक्त, पुणे | श्रीमती रश्मी शुक्ला हया बृहन्मुंबईत कार्यरत असताना त्यांची पोलीस आयुक्त, पुणे या पदावर बदली झाली होती. त्यांना दिनांक २६/०४/२०१६ रोजी कार्यमुक्त करण्यात आले. दिनांक १९/१२/२०१६ च्या पत्रान्वये त्यांना दिनांक १८/०३/२०१७ पर्यंत बृहन्मुंबईतील शासकीय निवासस्थानात राहण्यास मुदतवाढ देण्यात आली होती. त्यानंतर दिनांक २२/१२/२०१७ च्या पत्रान्वये दिनांक ३०/०९/२०१७ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली असून त्यापुढे रुपये १००/- प्रती चौ.फू.दरमहा या दराने भाडे भरुन निवासस्थान रिक्त करण्याबाबत सूचित करण्यात आले आहे. |
| २. | श्री.पंजाबराव उगले, पोलीस उप-आयुक्त | श्री.उगले हे बृहन्मुंबई कार्यरत असतांना त्यांना दिनांक २७/०६/२०१६ रोजी कार्यमुक्त करण्यात आले आहे. त्यांनी अदयाप बृहन्मुंबईत निवासस्थान रिक्त केलेले नसल्याने सह पोलीस आयुक्त (प्रशासन), बृहन्मुंबई यांनी दिनांक ०८/०३/२०१७ अन्वये नियमानुसार भाडे भरुन निवासस्थान रिक्त करण्याबाबत त्यांना सूचित केले आहे. |

---

**मुंबई-पुणे द्रुतगती मार्गावरील वाहतुक कोंडी व अपघात रोखण्यासाठी विलंब होत असल्याबाबत**

**(९) २५९८६ (३०-१२-२०१६). श्री.जनार्दन चांदूरकर, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.संजय दत्त :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबई-पुणे द्रुतगती मार्गावरील खंडाळा घाट (बोरघाट), खोपोली एक्झिट ते फूडमॉल, कामशेत बोगदा ते उर्से टोलनाका परिसर, खालापूर टोल नाका ते पनवेल परिसर या परिसरात चोवीस तास ड्रोनरोरद्वारे नजर ठेऊन लेनची शिस्त मोडणाऱ्यांसह अतिवेगाने वाहन चालविणाऱ्यांवर आणि चुकीच्या पद्धतीने ओव्हरटेक करणाऱ्यांवर कारवाई करण्यात येणार आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, मुंबई-पुणे द्रुतगती मार्गावरील नियमभंग करणाऱ्या किती वाहनांवर कारवाई करण्यात आले तसेच यामार्गावरील वाहतुक कोंडी व अपघात रोखण्यासाठी यश आले काय,

(३) असल्यास, राज्यातील इतरही द्रुतगती महामार्गावर ड्रोन बसविण्यासाठी कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०७-०२-२०१८) :** (१) मुंबई पुणे द्रुतगती मार्गावर अपघात टाळण्याच्या दृष्टीकोनातून प्रायोगिक तत्वावर ड्रोनचा वापर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे. लेनची शिस्त मोडणाऱ्यांसह अतिवेगाने वाहन चालविणाऱ्यांवर वाहतुक विभागाकडून कारवाई करण्यात येत आहे. तसेच वेगमर्यादेचे उल्लंघन करणाऱ्या वाहनचालकांवर स्पिडगनच्या माध्यमातून नोंद घेऊन केसेस करण्यात येतात.

(२) मुंबई पुणे द्रुतगती मार्गावर महामार्ग पोलीस व स्थानिक पोलिसांनी केलेल्या कारवाईची माहिती पुढीलप्रमाणे :-

| सन | केसेस | दंड (रुपये) |
|---|---|---|
| २०१४ | ७७७८८ | ९४,८१,९२५ |
| २०१५ | ८२०५४ | ९४,३०,०४५ |
| २०१६ | ९३९५१ | १,४५,३३,३५७ |
| एकूण | २५३७९३ | ३,३४,४५,३२७ |

महामार्गावरील वाहतुक कोंडी व अपघात रोखण्यासाठी -

i) द्रुतगती मार्गावरील वाहतुक कोंडी रोखण्यासाठी स्थानिक पोलिसांकडून दिवसा व रात्री पेट्रोलींग करण्यांत येते तसेच वाहतुकीचे नियमन केले जाते. लेन कटींग करणाऱ्या व वाहतुक नियमांचे उल्लंघन करणाऱ्या वाहन चालकांवर मोटार वाहन कायद्यान्वये कारवाई करण्यात येते.

ii) वाहतुक कोंडी व अपघातांना प्रतिबंध व्हावा याकरीता वाहनचालकांना सूचित करण्यासाठी वेगमर्यादेचे फलक, विविध सूचनांचे फलक, दिशादर्शक फलक तसेच अपघातप्रवण ठिकाणी संरक्षित वायररोप तसेच टोईंग क्रेन, पेट्रोलींग व्हॅन, चार कायमस्वरुपी रुग्णवाहिकेची सुविधा तसेच चार शिघ्र प्रतिसाद वाहनांची सोय उपलब्ध करुन देण्यांत आलेली आहे.

iii) द्रुतगती मार्गावर वाहतुक कोंडी व अपघात रोखण्यासाठी दिनांक १०/०९/२०१६ पासून विशेष मोहिमेचे आयोजन करण्यात आले असून महामार्गावर लेनकटींग करणारी वाहने, ओव्हरस्पिड वाहने, अनधिकृत पार्किंग केलेली वाहने इ. वाहनांवर नेमलेल्या स्पॉटरद्वारे वाहनांचे क्रमांक उर्से / कुसगांव / खालापूर येथील टोलनाक्यावर नेमलेल्या पोलिसांना कळवून त्यांचेवर मोटार वाहन कायद्यान्वये दंडात्मक कारवाई करण्यात येते.

iv) द्रुतगती मार्गावरील वाहतुक सुट्टीच्या दिवशी व गर्दीच्या वेळी सुरळीत ठेवण्यासाठी तसेच अपघातांचे प्रमाण कमी करण्यासाठी खालापूर टोल प्लाझा ते उर्से टोल प्लाझा या दरम्यान तीन एक्सल, मल्टी एक्सल व ओडीसी वाहनांना पुढे नमूद केल्याप्रमाणे प्रवेशबंदी करण्यात आलेली आहे. सदर मोहिमअंतर्गत वाहतुक कोंडीस पुर्णत: आळा बसलेला आहे.

**मुंबई-पुणे वाहिनी -**

शुक्रवारी संध्याकाळी किंवा दोन किंवा अधिक सुट्टया सुरु होण्याच्या आदल्या दिवशी संध्याकाळी १७.०० ते २०.०० वा.

शनिवारी सकाळी किंवा दोन किंवा अधिक सुट्टया सुरु होण्याच्या दिवशी सकाळी ०८.०० ते १२.०० वा.

**ठिकाण -** खालापूर टोल नाका व द्रुतगती मार्गावर रा.म. ०४ ला जोडणारा मार्ग

**पुणे-मुंबई वाहिनी -**

रविवारी संध्याकाळी किंवा सुट्टया समाप्त होण्याच्या शेवटच्या दिवशीच्या संध्याकाळी १६.०० ते २०.०० वा.

सोमवारी सकाळी किंवा सुट्टयानंतरच्या पहिल्या कार्यालयीन दिनाच्या सकाळी ०६.०० ते ९.०० वा.

**ठिकाण -** कुसगांव येथे रा.म. ०४ वर व उर्से येथे द्रुतगती मार्गावर डाव्या बाजूला

(३) राज्यातील इतरही द्रुतगती मार्गावर ड्रोनचा वापर करण्याबाबत अद्याप प्रस्ताव नाही.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील नगरपालिका व महानगरपालिका क्षेत्रातील आठवडी बाजाराबाबत

**(१०) २७२१५ (१३-०४-२०१७). श्री.धनंजय मुंडे, श्री.जयवंतराव जाधव, श्री.हेमंत टकले, श्री.अमरसिंह पंडित, ॲड.निरंजन डावखरे, श्री.अब्दुल्लाखान दुर्राणी, श्री.सतिश चव्हाण :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील नगरपालिका व महानगरपालिका क्षेत्रात शनिवार व रविवारी आठवडी बाजार सुरु करण्यात आले आहेत, सद्य:स्थितीत सुरु असलेल्या आठवडी बाजारांची संख्या व त्यामार्गाने विक्री झालेले कृषी उत्पादन व भाजीपाला यांचे प्रमाण खूप कमी आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, राज्यातील नगरपालिका व महानगरपालिका यांना बाजारासाठी मैदाने उपलब्ध करुन देण्याचे आदेश असताना बऱ्याच ठिकाणी अद्याप आठवडी बाजार सुरुच झालेले नाहीत, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, शेतकऱ्यांची स्वत: उत्पादित केलेला माल विक्री करणे अपेक्षित असताना काही व्यापारी मंडळी यामध्ये समाविष्ट होत असून या योजनेचा मूळ उद्देश दलाली कमी करणे हा असताना त्यास आळा घालण्यात आलेला नाही, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, शासन या आठवडी बाजाराकडे विशेष लक्ष देत नसल्याने शेतकऱ्यांना फायदा होत नाही, हे ही खरे आहे काय,

(५) असल्यास, शासनाचे आठवडी बाजाराविषयी धोरण काय आहे ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (३०-०१-२०१८) :** (१) व (२) संत शिरोमणी श्री.सावता माळी शेतकरी आठवडी योजनेंतर्गत महानगरपालिका क्षेत्रात ४१ ठिकाणी आठवडी बाजार भरविण्यात येत आहेत.

राज्यातील शेतकरी आठवडी बाजारातील आठवडयातील शेतमालाची एकूण विक्री अंदाजे १००० ते १५०० मे. टन होत आहे.

या व्यतिरिक्त महानगरपालिका व नगरपालिका क्षेत्रात आठवडी बाजार भरविण्यात येत असून त्याद्वारे शेतमालाची थेट ग्राहकांना विक्री करण्यात येते.

(३) शेतकरी आठवडी बाजारात सहभागी होण्यास इच्छूक शेतकरी / शेतकरी गट/ शेतकरी उत्पादक कंपन्यानी त्यांच्या शेतात पिकविलेला शेतमाल हा शेतकरी आठवडी बाजारात विक्री करण्यासाठी सादर केलेल्या अर्जाची छाननी करुन महाराष्ट्र राज्य कृषी पणन मंडळांमार्फत मंजूरी देण्यात येते.

शेतकरी आठवडी बाजारात फक्त वैयक्तिक शेतकरी/शेतकरी गट/शेतकरी उत्पादक कंपन्या यांच्याच सभासदांचा शेतमाल विक्री केला जातो.

(४) संत शिरोमणी, श्री.सावता माळी शेतकरी आठवडी बाजारामुळे शेतकऱ्यांना थेट ग्राहकांना शेतमाल विक्रीची संधी मिळाली असून कृषी माल शेतातून थेट बाजारात येत असल्याने काढणी नंतरच्या होणाऱ्या नुकसानीत मोठी घट झालेली आहे. तसेच रोख स्वरूपात मालाची रक्कम थेट शेतकऱ्यांच्या हातात पडते व आपल्या मालाचा बाजार भाव ठरविण्याचा शेतकऱ्यांना अधिकार प्राप्त झाल्याने शेतकऱ्यांचा आर्थिक लाभ होत आहे. तसेच बाजारात विक्री होणाऱ्या मालाचा शेतकऱ्यांना अंदाज आल्याने त्यांचा भाजीपाला शिल्लक राहत नाही.

(५) शेतकरी आठवडे बाजाराच्या माध्यमातून वैयक्तिक शेतकरी/शेतकरी गट/शेतकरी उत्पादक कंपनी यांच्यामध्ये जनजागृती करणे, शेतकऱ्यांस शेतमाल विक्रीसाठी विविध पर्याय उपलब्ध करुन देणे, कृषी माल विक्रीमध्ये

पारदर्शकता आणणे, मध्यस्थांची संख्या कमी करणे, शेतमाल विक्री खर्च कमी करणे, यासाठी राज्यात जास्तीत जास्त शेतकरी आठवडे बाजार सुरु करणे हे शासनाचे धोरण आहे.

शेतकऱ्यांना शेतमाल विक्रीसाठी महानगरपालिका व नगरपालिका यांनी त्यांच्या कार्यालयाच्या आवारात/भाजी मंडईत जागा देण्याचे तसेच मैदाने उपलब्ध करुन देण्याचे निर्देश दिले आहेत तसेच शहरातील सध्या अस्तित्वात असलेल्या भाजी मंडईमध्ये शेतकरी उत्पादक गट/शेतकरी उत्पादक कंपनी यांना किमान १० ते १५% गाळे/मोकळी जागा उपलब्ध करुन देण्याचे निर्देश शासनाने दिनांक २४ ऑगस्ट, २०१६ व ११ ऑगस्ट, २०१७ रोजीच्या नगरविकास विभागाच्या शासन निर्णयान्वये दिले आहेत.

---

## राज्यातील केंद्रीय आश्रमशाळांच्या अनुदान मंजूरीबाबत

**(११) २७४२४ (१५-०४-२०१७). डॉ.अपूर्व हिरे, श्री.सतिश चव्हाण, श्री.अब्दुल्लाखान दुर्राणी, श्री.अमरसिंह पंडित, श्री.धनंजय मुंडे, श्री.जयवंतराव जाधव, श्री.सुनिल तटकरे, श्री.हेमंत टकले, ॲड.निरंजन डावखरे, श्री.जगन्नाथ शिंदे, श्री.आनंद ठाकूर, श्री.विक्रम काळे : दिनांक ९ डिसेंबर, २०१६ रोजी सभागृहाच्या पटलावर ठेवण्यात आलेल्या अतारांकित प्रश्नोत्तरांच्या यादी क्रमांक ४ मधील प्रश्न क्रमांक २२१२९ ला दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **सामाजिक न्याय मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील केंद्र पुरस्कृत योजनेंतर्गत केंद्र शासनाचे अनुदान मिळणेसाठी सद्य:स्थितीत सुमारे ३१९ आश्रमशाळांना राज्य शासनाने कायम विनाअनुदान तत्वावर मान्यता दिली असून सदर आश्रमशाळांचे प्रस्ताव अनुदान मंजुरीसाठी केंद्र शासनास पाठविण्यात आले आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, केंद्र शासनाकडे अनुदान मंजुरीसाठी पाठविण्यात आलेल्या प्रस्तावांपैकी फक्त ३४ आश्रमशाळांनाच अनुदान मंजुर केले असून उर्वरित आश्रमशाळांना केंद्र शासनाने अद्याप अनुदान मंजुर केलेले नाही, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, राज्यातील केंद्र पुरस्कृत योजनेतील उर्वरित आश्रमशाळांना अनुदान मंजुर न होण्याची कारणे काय आहेत व त्यांना अनुदान केंव्हापर्यंत मंजुर होणे अपेक्षित आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.राजकुमार बडोले (२४-०१-२०१८) :** (१) होय.
केंद्र पुरस्कृत एकूण ३२२ आश्रमशाळांना राज्य शासनाने कायम विना-अनुदानित तत्वावर दिलेली आहे.
(२) होय.
(३) केंद्र पुरस्कृत आश्रमशाळेची योजना ही सामाजिक न्याय व अधिकारिता मंत्रालय भारत सरकार यांची असून अनुसूचित जातीच्या मुलामुलींकरिता निवासी/ अनिवासी प्राथमिक माध्यमिक आश्रमशाळांना या योजनेंतर्गत केंद्र शासनाकडून ९० टक्के व स्वयंसेवी संस्थेचा १० टक्के हिस्सा या सूत्रानुसार सहायक अनुदान दिले जाते.
या योजनेंतर्गत सुमारे ३२२ आश्रमशाळांना राज्य शासनाची कायम विनाअनुदान तत्वावर मान्यता देण्यात येऊन त्यांचे प्रस्ताव केंद्र शासनास शिफारस करण्यात आले होते. तथापि, निधी उपलब्धतेनुसार यापैकी फक्त ३४ आश्रमशाळांना केंद्र शासनाकडून अनुदान देण्यात येत आहे.
उर्वरित आश्रमशाळांना अनुदान देण्याबाबत केंद्र शासनाकडून कार्यवाही करण्यात आलेली नाही. सबब, सदरहू आश्रमशाळांना राज्य शासनाचे अनुदान मंजूर करण्याबाबत विविध संस्थाचालक/ लोकप्रतिनिधींकडून निवेदने शासनास प्राप्त झालेली आहेत.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## जलचर बेडुक प्रजातींचे रक्षण करण्याबाबत

**(१२) २७७९७ (१५-०४-२०१७). श्रीमती विद्या चव्हाण, श्री.जयवंतराव जाधव, श्री.अनिल भोसले, अॅड.निरंजन डावखरे, श्री.धनंजय मुंडे, श्री.हेमंत टकले, श्री.अमरसिंह पंडित :** सन्माननीय **पर्यावरण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) डेंग्यु, मलेरिया इत्यादी रोगजंतु तसेच पिकावरील किडी खाद्य असलेल्या जलचर बेडुक प्रजातीचे रक्षण आणि त्यांचे कृत्रिम प्रजनन करुन त्यांची संख्या वाढविण्याची आवश्यकता आणि कार्यवाही करण्यासाठी विकास

प्रतिष्ठाण परभणी यांच्या पत्रासहित लोकप्रतिनिधींनी मा.पर्यावरण मंत्री यांना दिनांक १३ डिसेंबर, २०१६ रोजी निवेदन दिले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, विकास प्रतिष्ठाणाच्या पत्रातील माहितीचे आणि त्यानुषंगाने मागण्यांचे स्वरुप काय आहे,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी चौकशी करून शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.रामदास कदम (२१-०२-२०१८) :** (१) होय.
(२) व (३) प्रतिष्ठाणाने सदरहू पत्राद्वारे बेडूक जल परिस्थिकीमध्ये महत्वाचा जैविक एकक असल्याने त्याचे संवर्धन होणेबाबत कळविले आहे. त्यानुसार शालेय तथा उच्च शिक्षण स्तरावर बेडकाविषयी शास्त्रीय माहिती व त्याचे जल परिस्थिकीतील अन्नसाखळीच्या महत्वाबाबत शास्त्रीय माहितीचा समावेश अभ्यासक्रमात करण्यात आलेला आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यभरातील एकाही आमदार आदर्श ग्राम गावांचा आराखडा तयार करण्यात आलेला नसल्याबाबत

**(१३) २७९७० (१७-०४-२०१७). श्री.जयवंतराव जाधव : तारांकित प्रश्न क्रमांक १९५५१ ला दिनांक १ ऑगस्ट, २०१६ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) आमदार आदर्श ग्राम योजनेसाठी पुण्याच्या यशदाची मदत घेवून माहे डिसेंबर, २०१५ पर्यंत ग्रामविकास आराखडे तयार करण्याचा शासनाचा निर्णय होवूनही माहे जानेवारी, २०१७ पर्यंत राज्यभरातील एकाही आदर्श ग्राम गावांचा यशदाकडून आराखडा तयार करण्यात आलेला नसल्याचे निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, आदर्श ग्राम योजनेचे आराखडे तयार न झाल्यामुळे योजना अयशस्वी होत आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन आमदार आदर्श ग्राम योजनेची परिणामकारकरित्या अंमलबजावणी करण्यासाठी कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (१४-०२-२०१८) :** (१) हे खरे नाही.
(२) खरे नाही.

माहे जानेवारी, २०१७ अखेर १४८ ग्रामविकास आराखडे ग्रामपंचायत स्तरावर तयार झालेले असून नोव्हेंबर, २०१७ अखेर २२५ गावांचे ग्रामविकास आराखडे तयार करण्यात आलेले आहेत.
(३) आमदार आदर्श ग्राम योजनेच्या अंमलबजावणी संदर्भात शासन स्तरावरून दिनांक ८ ऑक्टोबर, २०१५ व दिनांक ४ मे, २०१७ शासन परिपत्रक निर्गमित केलेली आहेत.

तसेच सचिव, ग्रामविकास विभाग यांच्यास्तरावरुन दिनांक ७ जुलै, २०१७ च्या अ.शा.पत्रान्वये ग्राम विकासाची कामे प्राधान्याने पूर्ण करण्याबाबत विभागीय आयुक्तांना कळविण्यात आले आहे.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**राज्यातील किशोरवयातील युवक व युवतींमध्ये मद्‌यपानाचे प्रमाण वाढत असल्याबाबत**

**(१४) २८२३३ (१३-०४-२०१७). श्री.आनंदराव पाटील :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यातील किशोरवयातील युवक व युवतींमध्ये मद्‌यपानाचे प्रमाण वाढत असल्याचे निरीक्षण मुंबईतील केईएम रुग्णालयाच्या मानसोपचार विभागाने नोंदविले असल्याचे माहे डिसेंबर, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सद्‌य:स्थितीत मद्‌यपान करणाऱ्यांचा वयोगट बारा ते चौदापर्यंत खाली आला असल्याने हे तरुण पिढीच्या विकासासाठी घातक असून किशोरवयातील युवक व युवतींच्या मद्‌यप्राशनाला आळा घालण्यासाठी शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०१-०२-२०१८) :** (१) हे खरे आहे.

(२) किशोर वयातील युवक व युवतींच्या मद्यप्राशनाला आळा घालण्यासाठी बृहन्मुंबई महानगरपालिकेमार्फत खालील प्रमाणे कार्यवाही करण्यात आली/येत आहे.

- शाळांमधून विद्यार्थी, पालक व शिक्षकांकरिता मद्यपानविरोधी जनजागृती करण्यासाठी पोस्टर प्रदर्शन, मार्गदर्शनपर व्याख्याने व कार्यशाळा राबविल्या जातात.
- स्वयंसेवी संस्थांबरोबर डॉक्टर, समुपदेशक व समाजसेवक यांचेमार्फत व्याख्याने आयोजित करण्यात येतात.
- "अंमली पदार्थ विरोधी कक्ष" यांच्याबरोबर मुंबईतील अनेक शाळा व महाविद्यालयांमध्ये व्यसन मुक्तीपर विविध प्रकारचे जनजागृतीचे कार्यक्रम व व्याख्याने घेतली जातात.
- दिनांक ३१ मे हा "तंबाखू मुक्त दिन" व दिनांक २६ जून हा "जागतिक व्यसनमुक्ती दिन" या दिवशी विविध जनजागृतीपर कार्यक्रम आयोजित केले जातात.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

**मौजे झरी (ता.पाथरी, जि.परभणी) येथील सिमेंट बंधाऱ्याच्या कामाबाबत**

**(१५) २९३९८ (१५-०४-२०१७). श्री.अब्दुल्लाखान दुर्राणी, श्री.धनंजय मुंडे, श्री.सुनिल तटकरे, श्री.सतिश चव्हाण, श्री.अमरसिंह पंडित :** सन्माननीय **जलसंधारण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मौजे झरी (ता.पाथरी, जि.परभणी) येथील सिमेंट बंधाऱ्या प्रकरणी दिलेल्या तक्रारीवरून उपविभागीय अधिकारी, पाथरी यांनी जिल्हाधिकारी, परभणी यांच्याकडे सन २०१६ मध्ये अहवाल सादर केला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन संबंधितांवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**प्रा. राम शिंदे (०९-०१-२०१८) :** (१) होय, हे खरे आहे.

(२) कार्यकारी अभियंता, जायकवाडी पाटबंधारे विभाग क्र.०२, परभणी यांचेद्वारे सिमेंट नाला बांध क्र. ०१ व ०२ (झरी) च्या बांधकामाचे व काँक्रीट कामाची गुणवत्ता विषयक चाचणी गुणनियंत्रण मंडळ, औरंगाबाद यांचेमार्फत करण्यात आली असून गुणवत्ता निष्कर्ष मापदंडानूसार योग्य असल्याचे आढळून आले आहे.

तसेच जलयुक्त शिवार अभियानांतर्गत सन २०१५-१६ मध्ये मौजे झरी येथील पूर्ण झालेल्या कामांचे वाप्कोस लिमिटेड, लातूर या त्रयस्थ संस्थेमार्फत मूल्यमापन करण्यात आले असून त्यांचे अहवालानूसार सिमेंट नाला बांध क्र.०१ व ०२ ची कामे काही किरकोळ त्रुटी वगळता समाधानकारक आढळून आली आहेत. किरकोळ त्रुटींची पुर्तता कार्यकारी अभियंता, ल.पा.विभाग, जि.प.परभणी यांचेमार्फत करण्यात येत आहेत.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## सावदा (ता.भुसावळ, जि.जळगांव) येथे काळया बाजारात रॉकेल विक्रीसाठी घेऊन जात असलेल्या ट्रकवर पोलिसांनी कारवाई केल्याबाबत

**(१६) २९५८६ (१३-०४-२०१७). श्रीमती स्मिता वाघ :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) सावदा (ता.भुसावळ, जि.जळगांव) येथून जामनेरकडे काळया बाजारात निळे रॉकेल विक्रीसाठी घेऊन जात असलेल्या ट्रकवर यावल नाक्यावर दिनांक २२ जानेवारी, २०१७ रोजी वा त्यासुमारास पोलिसांनी कारवाई केली, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, या कारवाईत किती जणांना अटक करण्यात आली व किती रॉकेल जप्त करण्यात आले आहे,

(३) असल्यास, अटक करण्यात आलेल्यावर कोणत्या कलमान्वये कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०६-०२-२०१८) :** (१) होय, हे खरे आहे.
(२) व (३) शासकीय कोटयातील निळे रॉकेल काळया बाजारात ट्रकमध्ये इंधन म्हणून वापरण्यासाठी विकणे/विकत घेणे व अवैधरित्या वाहतुक करणे या गुन्हयासाठी एकूण ४ आरोपींना अटक करण्यात आली असून भुसावळ शहर पो.स्टे. येथे भाग ६ गुरनं ३००५/२०१७ भारताचा जीवनावश्यक वस्तु कायदा १९५५ क ३ चे उल्लंघन ७ प्रमाणे गुन्हा दाखल करण्यात आलेला आहे. सदर गुन्हयात रुपये १,२६,३२०/ किंमतीचे एकूण ३००० लिटर शासकीय कोटयातील निळे रॉकेल जप्त करण्यात आले आहे. सदरचा गुन्हा सद्य:स्थितीत पोलीस तपासावर आहे
(४) विलंब झालेला नाही.

---

## राज्यात वाहन चोरीचे प्रमाण वाढल्याबाबत

**(१७) ३०७९९ (१३-०४-२०१७). श्री.विनायकराव मेटे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यात मोटार कार, दुचाकी वाहने यांचे चोरीचे प्रमाण वाढले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, माहे जानेवारी, २०१६ ते फेब्रुवारी, २०१७ या कालावधीत वाहन चोरीचे किती प्रकार घडले आहेत, तसेच तपासात पोलीस यंत्रणेला किती यश आले आहे,
(३) असल्यास, राज्यात वाहन चोरी करणाऱ्या टोळया कार्यरत झाल्या आहेत, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, वाहन चोरीला आळा घालण्यासाठी पोलीस विभागामार्फत कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (३०-०१-२०१८) :** (१) सन २०१६ मध्ये मोटार कार चोरीचे एकूण १,८८१ गुन्हे व दुचाकी वाहन चोरीचे एकूण १९,७०६ गुन्हे दाखल झाले आहेत. सन २०१५ पेक्षा मोटार कार चोरीमध्ये ६४ ने व दुचाकी वाहन चोरीमध्ये ९७६ ने वाढ झाली आहे.

(२) ते (४) माहे जानेवारी, २०१६ ते फेब्रुवारी, २०१७ या कालावधीत वाहन चोरीचे एकूण २६००६ एवढे गुन्हे दाखल करण्यात आले आहेत. त्यापैकी ६०७६ एवढे गुन्हे उघड झाले आहेत.

वाहन चोरीला आळा घालण्यासाठी पोलीस विभागामार्फत वाहन चारीचे गुन्हे दाखल करुन तसेच गुन्हे कमी करण्यासाठी प्रभावी प्रतिबंधात्मक उपाययोजना करुन गुन्ह्यांचा तपास करण्यात येत आहे.

(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**एम.आय.जी. कॉलनी, वांद्रे (पुर्व) या सहकारी गृहनिर्माण संस्थेचा पुनर्विकास करण्याबाबत**

**(१८) ३०८८० (१५-०६-२०१७). श्री.जनार्दन चांदूरकर :** सन्माननीय **गृहनिर्माण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) एम.आय.जी. कॉलनी, वांद्रे (पुर्व) मुंबई-४०००५१ येथील ५० वर्षापुर्वी बांधण्यात आलेल्या एम.आय.जी नं. ६ या सहकारी गृहनिर्माण संस्थेचा पुनर्विकास करण्यासाठी ७० टक्के सदस्यांच्या संमतीचा ठराव पास करुन सोसायटीच्या ४९ सभासदांनी म्हाडाकडे दिनांक २९/४/२०१५ रोजी वा त्यासुमारास पाठविण्यात येऊनही या गृहनिर्माण संस्थेचा पुनर्विकास करण्यात येत नसल्याचे माहे एप्रिल, २०१७ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, याप्रकरणी चौकशी करण्यात आली आहे काय, त्यात काय आढळून आले व तद्नुसार सदरहू गृहनिर्माण संस्थेचा पुनर्विकास करण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.प्रकाश महेता (२०-०१-२०१८) :** (१) मुख्य अधिकारी, मुंबई गृहनिर्माण व क्षेत्रविकास मंडळ यांचेकडून प्राप्त अहवालानुसार, गांधी नगर, वांद्रे (पूर्व) येथील एम.आय.जी. ग्रुप-६ या संस्थेने एप्रिल, २०१५ मध्ये पुनर्विकासाचा प्रस्ताव मुंबई मंडळाकडे सादर केला होता. परंतु संस्थेच्या कार्यकारिणी मंडळाची मे, २०१५ मध्ये निवडणूक होऊन नविन कार्यकारी मंडळ अस्तित्वात आले.

संस्थेचे सभासद श्री.दिनेशराव पाटील यांनी सदर संस्थेच्या इमारती ५२ वर्षे जुन्या झाल्या असून डळमळीत झाल्या आहेत, त्यामुळे त्या केव्हाही पडू शकतील असे नमूद केलेले दिनांक ०७/१०/२०१६ चे पत्र शासनाकडून म्हाडास प्राप्त झाले. त्या अनुषंगाने म्हाडाने दिनांक २१/१०/२०१६ च्या पत्राने सदरहू संस्थेस पुनर्विकासाकरीता सोबत जोडलेल्या यादीप्रमाणे कागदपत्रांची पुर्तता करुन परिपूर्ण पुनर्विकास प्रस्ताव चेक लिस्ट (check list) प्रमाणे सादर करण्याबाबत संस्थेला कळविण्यात आले.

तथापि, नविन कार्यकारी मंडळाचे वि.नि.नि. ३३(५) अंतर्गत शासनाच्या सुधारित धोरण २०१३ नूसार गृहसाठा तत्वावर पुनर्विकास करण्याबाबत एकमत होत नव्हते. तसेच संस्थेने दिनांक १४/१२/२०१६ च्या पत्रान्वये म्हाडास कळविले की, Our society does not want to be the one to go under redevelopment under the current constraints. The joint redevelopment with MHADA as requested by Mr.Dinesh Patil, at this point of time is not being considered by the society due to constraint of the current DCR. Hence we are unable to give the २१ documents listed by you, but we shall do so once we complete the entire process of phase I of our redevelopment process.

(२) पुनर्विकासाबाबतचा परिपूर्ण प्रस्ताव सदरहू संस्थेने अद्यापही सादर केलेला नाही.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## सातारा जिल्हा परिषेदत अधिकाऱ्यांची रिक्त पदे असल्याबाबत

**(१९) ३१०८९ (११-०८-२०१७). श्री.आनंदराव पाटील** : सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) सातारा जिल्हा परिषेदत गत काही वर्षापासून वर्ग १ व २ मधील अधिकाऱ्यांची सुमारे ९८ पदे रिक्त असल्याचे माहे मे, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, रिक्त पदे असल्याने जिल्ह्यातील विकास कामे प्रलंबित आहेत, याबाबत शासनाने चौकशी करुन सदर रिक्त पदे त्वरित भरण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (०९-०२-२०१८)** : (१) सातारा जिल्हा परिषदेत वर्ग-१ मधील ७९ पदे वर्ग-२ मधील ३८ अशी एकूण ११७ पदे रिक्त आहेत.
(२) व (३) जिल्हा परिषदेतील वर्ग-१ व वर्ग-२ मधील विविध विभागातील रिक्त पदे तातडीने भरण्याबाबत या विभागाकडून सर्व संबंधित प्रशासकीय विभागांना योग्य ती कार्यवाही करण्याबाबत २२/१२/२०१७ च्या पत्रान्वये कळविण्यात आले आहे.

---

## कोल्हापूर जिल्हा परिषद व पंचायत समितीमध्ये अधिकारी व कर्मचाऱ्यांची रिक्त पदे असल्याबाबत

**(२०) ३११२२ (१८-०८-२०१७). श्री.सतेज ऊर्फ बंटी पाटील :** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) कोल्हापूर जिल्ह्यातील जिल्हा परिषद व पंचायत समितीमध्ये शासकीय अधिकारी व कर्मचाऱ्यांची अनेक रिक्त पदे आहेत, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन रिक्त पदे भरण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (०९-०२-२०१८)** : (१) कोल्हापूर जिल्ह्यातील जिल्हा परिषद व पंचायत समितीमध्ये महाराष्ट्र विकास सेवा वर्ग-१ मधील २३ मंजूर पदापैकी ५ पदे रिक्त असून वर्ग-२ मधील १५ मंजूर पदापैकी १२ पदे रिक्त आहेत.

महाराष्ट्र विकास सेवा वगळून वर्ग-१ च्या ३०७ मंजूर पदापैकी १२४ पदे रिक्त असून वर्ग-२ मधील ९२ मंजूर पदापैकी ५० पदे रिक्त आहेत.

क वर्गातील १५५६ पदे व ड वर्गातील १३९ पदे रिक्त आहेत.

(२) व (३) शासनस्तरावर महाराष्ट्र विकास सेवा वर्ग-१ व वर्ग-२ मधील रिक्त पदे सरळसेवेद्वारे, पदोन्नतीद्वारे व बदलीद्वारे भरण्याबाबत कार्यवाही सुरू आहे.

महाराष्ट्र विकास सेवा वगळून जिल्हा परिषदेतील वर्ग-१ व वर्ग-२ मधील विविध विभागातील रिक्त पदे तातडीने भरण्याबाबत या विभागाकडून सर्व संबंधित प्रशासकीय विभागांना योग्य ती कार्यवाही करण्याबाबत दिनांक २२/१२/२०१७ च्या पत्रान्वये कळविण्यात आले आहे.

तसेच वर्ग क व ड संवर्गातील रिक्त पदे शासनस्तरावर सरळसेवेद्वारे व क्षेत्रियस्तरावर पदोन्नतीद्वारे भरण्याबाबत उचित कार्यवाही सुरू आहे.

---

**जिल्हा रुग्णालय (जि.सातारा) येथील चतुर्थश्रेणी कर्मचाऱ्यांच्या प्रलंबित मागण्याबाबत**

**(२१) ३१२०१ (१८-०८-२०१७). श्री.नरेंद्र पाटील, श्री.धनंजय मुंडे, श्री.सुनिल तटकरे, श्री.हेमंत टकले, श्री.किरण पावसकर, अॅड.निरंजन डावखरे, श्री.अमरसिंह पंडित, श्री.जयवंतराव जाधव, श्रीमती विद्या चव्हाण, श्री.आनंद ठाकूर, अॅड.राहुल नार्वेकर, श्री.ख्वाजा बेग :** सन्माननीय **सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) जिल्हा रुग्णालय (जि.सातारा) येथील चतुर्थश्रेणी कर्मचाऱ्यांच्या प्रलंबित मागण्यासंदर्भात सातारा जिल्हा राज्य चतुर्थश्रेणी कर्मचारी संघटनेच्यावतीने दिनांक १६ मे, २०१७ रोजी जिल्हा रुग्णालयासमोर बेमुदत धरणे आंदोलन करण्यात आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर संघटनेच्या प्रस्तावित मागण्या काय आहेत, तसेच संघटनेने निवेदनात नमूद केल्यापैकी किती मागण्या मंजूर करण्यात आल्या आहेत व उर्वरित मागण्याबाबत शासनाने कोणता निर्णय घेतला आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**डॉ. दीपक सावंत (०१-०१-२०१८) :** (१) हे खरे नाही.
(२) प्रश्न उद्‌भवत नाही.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**मुंबई महानगरपालिका क्षेत्रातील रस्ते खड्डे मुक्त करण्याबाबत**

**(२२) ३१४९० (११-०८-२०१७). श्री.किरण पावसकर, श्री.धनंजय मुंडे, श्री.हेमंत टकले, श्री.नरेंद्र पाटील, श्री.आनंद ठाकूर, श्रीमती विद्या चव्हाण, ॲड.राहुल नार्वेकर, श्री.जयवंतराव जाधव, श्री.अमरसिंह पंडित :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मुंबई महानगरपालिका क्षेत्रातील ९३८ रस्ते खड्डे मुक्त करण्याचा निर्णय शासनाने माहे एप्रिल, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान घेतला आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, तद्‌नुसार शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२९-०१-२०१८) :** (१), (२) व (३) बृहन्मुंबई महानगरपालिका हद्दीतील रस्त्यांवरील खड्डयांचे प्रमाण अत्यल्प रहावे याकरिता बृहन्मुंबई महानगरपालिकेमार्फत माहिती संकलित करुन ९३८ रस्त्यांची यादी तयार करण्यात आली होती.

तद्‌नंतर पावसाळयानंतर एकूण ५८२ रस्त्यांची प्राधान्यसूची-२ अंतर्गत सुधारीत यादी तयार करण्यात येऊन, त्यापैकी ११० कामे पावसाळयापूर्वी पूर्ण झाली होती व उर्वरित ४७२ कामांपैकी आजपर्यंत १२१ कामे पूर्ण झाली असून, उर्वरित कामे प्रगतीपथावर आहेत.

---

## वाशी (नवी मुंबई) कृषी उत्पन्न बाजार समितीत भाज्यांची आवक कमी होत असल्याबाबत

**(२३) ३१८४४ (१८-०८-२०१७). श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.संजय दत्त, श्री.रामहरी रुपनवर :** सन्माननीय **पणन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) वाशी (नवी मुंबई) कृषी उत्पन्न बाजार समितीत बदलत्या हवामानामुळे भाजीपाल्यांच्या उत्पादनावर परिणाम होत असून बाजारपेठेत भाज्यांची आवक कमी होत असल्याचे माहे एप्रिल, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, वाढत्या तापमानामुळे भाजीपाला फारकाळ टिकत नसल्याने शेतकऱ्यांचेही मोठे नुकसान होत असून भाजीपाल्याच्या दरात २५ टक्क्यांनी वाढ झाली आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुभाष देशमुख (०१-०२-२०१८) :** (१) हे खरे नाही.

(२) हे खरे नाही.

(३) मुंबई कृषी उत्पन्न बाजार समितीमध्ये एप्रिल, २०१६ च्या तुलनेत एप्रिल, २०१७ मध्ये शेतमालाची आवक वाढल्याचे दिसून आले आहे.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## सिडको नाशिक परिसरात विद्‌युत उपकरणे व दुरूस्ती साहित्यांचा पुरवठा करण्याबाबत

**(२४) ३१९६९ (१८-०८-२०१७). डॉ.अपूर्व हिरे :** सन्माननीय **ऊर्जा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) सिडको नाशिक परिसरात कार्यरत वीज वितरण कंपनीच्या कर्मचाऱ्यांकडे अत्यावश्यक वीज उपकरणे व दुरूस्ती साहित्यांची कमतरता असल्याने संबंधित कर्मचाऱ्यांना अडचणी येत असून जनतेचा रोष सहन करावा लागत असल्याचे निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, वीज वितरण कंपनीच्या कर्मचाऱ्यांना आवश्यक विद्युत उपकरणे व दुरूस्ती साहित्य उपलब्ध करून देणेबाबत शासनाकडून कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रशेखर बावनकुळे (०१-०२-२०१८) :** (१) हे खरे नाही.

सिडको उपविभाग हा नाशिक शहर विभाग-१ अंतर्गत येत असून वीज पुरवठा सुरळीत ठेवण्याकरीता लागणारी उपकरणे व दुरुस्ती साहित्य वेळोवेळी मागणीनुसार देण्यात येते. तसेच देखभाल व दुरुस्तीसाठी लागणारे साहित्य उदा. विविध क्षमतेचे रोहित्र, कंडक्टर आणि केबल, फयुज, वायर, पॅराटेप इ. साहित्य वरिष्ठ कार्यालयाकडून वेळोवेळी पुरविले जाते.
(२) प्रश्न उद्‌भवत नाही.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## उटावली (ता.विक्रमगड, जि.पालघर) ग्रामपंचायतीतील गैरव्यवहाराची चौकशी करुन दोषींवर कारवाई करण्याबाबत

**(२५) ३२३३२ (१८-०८-२०१७). श्री.आनंद ठाकूर :** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) उटावली ग्रामपंचायत (ता.विक्रमगड, जि.पालघर) येथे १४ वा वित्त आयोग व पेसा निधी गैरव्यवहाराप्रकरणी चौकशी सुरु होती, हे खरे आहे काय.
(२) असल्यास, या प्रकरणाची चौकशी पूर्ण झाली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने या प्रकरणात दोषी असलेल्यांवर शासनाने कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे.
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (१७-०२-२०१८) :** (१) होय.
(२) होय. चौकशीअंती कुठल्याही प्रकारचा गैरव्यवहार झाल्याचे आढळून आलेले नाही.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## मुंबई शेअर बाजाराच्या रस्त्याबाबत

**(२६) ३२३८९ (११-०८-२०१७). श्रीमती हुस्नबानू खलिफे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबईतील शेअर बाजार ही इमारत, कामा इमारत, रोटुंगा व पी.जीजीभाय टॉवर्स या तीन इमारती मिळून तयार झाली असून मुंबई शेअर बाजार ही संस्था सन २००५ नंतर कंपनी कायदा, १९५६ अंतर्गत पुनर्गठित झाल्यामुळे एक खाजगी संस्था आहे सर्व शासकीय यंत्रणा या खाजगी संस्थेवर सामान्यांच्या पैशाचा गैरवापर करुन मोठ्या प्रमाणात सवलती देत असल्याचे माहे एप्रिल, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, मुंबई शेअर बाजाराच्या चारही बाजूने असलेला वाहन रस्ता जनतेला बीएसईच्या नियमानेच खुला आहे, सायकललासुध्दा तेथे प्रवेश नाही अनेक कायद्यांचे तेथे उघडपणे उल्लंघन होत असल्याचे आरोप कामगार संघटना संयुक्त कृती समितीने केला आहे तरी याबाबत शासन त्वरीत चौकशी करुन आवश्यक कार्यवाही करणार वा करीत आहे काय,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२९-०१-२०१८) :** (१), (२) व (३) मुंबई शेअर बाजार इमारतीच्या भोवती असलेल्या मुंबई समाचार मार्ग, आंबालाल दोशी मार्ग व दलाल स्ट्रीट येथील रस्ते संभावित आंतकवादी हल्ल्याच्यादृष्टीकोनातून व सुरक्षेच्या उपाययोजनेकरिता मुंबई पोलीस दलामार्फत बॅरिकेडींग व बॅरियर्स बसवून, वाहनांच्या रहदारीकरिता व सायकल स्वारांकरिता सन २०११ मध्ये बंद करण्यात आले आहेत. तथापि, सदर रस्त्यांवर पादचारी वाहतुक सुरु आहे.

मुंबई स्टॉक एक्सचेंज भोवतालच्या बॅरिकेडिंगकरिता १५०० चौ.मी. एवढे क्षेत्रफळ व्याप्त केल्यामुळे मुंबई स्टॉक एक्सचेंजच्या व्यवस्थापनास दिनांक ०१/०४/२०१२ ते ३१/०३/२०१७ पर्यंतच्या ६० महिन्यांसाठी रुपये १.२७ कोटी इतके पार्किंग शुल्क रुपये १०,०००/- दंड व सदर शुल्कावर १५% व्याज आकारुन येणारे एकूण रुपये १.४६ कोटी इतके शुल्क भरण्याविषयी बृहन्मुंबई महानगरपालिकेमार्फत कळविण्यात आले आहे.

---

## कोकणातील परप्रांतीयांच्या घुसखोरीमुळे आंबा विक्रीत घट झाल्याबाबत

**(२७) ३२५१९ (१८-०८-२०१७). श्रीमती हुस्नबानू खलिफे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.संजय दत्त, श्री.रामहरी रुपनवर :** सन्माननीय **पणन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) अनेक वर्षापासून बाजारपेठेवर कोकणातील हापूसचीच मक्तेदारी असली तरीही यावर्षीच्या हंगामात परप्रांतीयांच्या घुसखोरीमुळे हापूस आंब्याची विक्री निम्म्यावर आली असून शेतकऱ्यांच्या उत्पन्नातही घट झाल्याचे दिनांक ७ मे, २०१७ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, कोकणातील हापूसची जास्तीत जास्त विक्री होऊन शेतकऱ्यांच्या उत्पन्नात वाढ होण्यासाठी शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुभाष देशमुख (२८-११-२०१७) :** (१) हे खरे नाही. सन २०१६ च्या तुलनेत सन २०१७ मध्ये मुंबई कृषी उत्पन्न बाजार समितीत सुमारे ४४४६८० क्विंटल जादा आंब्याची आवक झाली.

(२) आंबा उत्पादकांना चांगला दर प्राप्त व्हावा, यादृष्टीने कृषी पणन मंडळामार्फत विविध उपक्रम राबविण्यात येत आहेत. निर्यातदारांना आंब्याचा थेट पुरवठा व्हावा व निर्यातवृध्दी व्हावी, यादृष्टीने प्रयत्न सुरू करण्यात आले आहेत. उत्पादकांना थेट विक्री करण्यासाठी सुविधा सन २००६ पासून सुरू करण्यात आली असून त्याचा फायदा कोकणातील बागायतदार घेत आहेत. चालू वर्षी आंबा उत्पादकांना आठवडा बाजारात देखील थेट विक्रीची सुविधा उपलब्ध करून देण्यात आली आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील अमृत शहरांमध्ये दरवर्षी "ग्रीन पार्क" उभारण्याबाबत

**(२८) ३२८६५ (१८-०८-२०१७). श्री.रविंद्र फाटक :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) झपाटयाने शहरीकरण झाल्याने पर्यावरणाच्या अनेक समस्या निर्माण झाल्याने नागरिकांना मोकळा आणि स्वच्छ श्वास घेणे कठिण होत असल्याने यावर मात करण्यासाठी राज्यातील अमृत शहरांमध्ये दरवर्षी "ग्रीन पार्क" उभारण्याचा निर्णय केंद्र शासनाने घेतला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, राज्यातील सुमारे ४३ शहरांचा यात समावेश करण्यात आला आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, सदर ग्रीन पार्कचे स्वरूप काय आहे व त्यामध्ये कोणकोणत्या शहरांचा समावेश करण्यात आला आहे ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०५-०२-२०१८) :** (१) केंद्र शासन पुरस्कृत अमृत अभियानांतर्गत राज्यातील ४३ शहरांमध्ये हरित क्षेत्राची निर्मिती करण्याच्या अनुषंगाने हरित क्षेत्र विकास प्रकल्प राबविण्यात येत आहेत.

(२) राज्यातील ४३ अभियान शहरांमध्ये हरित क्षेत्र विकास प्रकल्प राबविण्यात येत आहेत.

(३) सदर योजनेंतर्गत अभियान शहरांच्या विकास आराखडयामध्ये हरित क्षेत्रांच्या विकासासाठी राखून ठेवलेल्या क्षेत्रांवर हरित क्षेत्र प्रकल्पांची अंमलबजावणी करण्यात येणार आहे.

अमृत अभियानांतर्गत समाविष्ट असलेल्या ४३ शहरांमध्ये हरित क्षेत्र विकास प्रकल्पांसाठी निधी उपलब्ध करुन दिला जाणार आहे.

---

## शाळेतील मुलांना पोषण आहार देण्याबाबत

**(२९) ३२८८८ (११-०८-२०१७). डॉ.अपूर्व हिरे : तारांकित प्रश्न क्रमांक २३७९४ ला दिनांक ९ डिसेंबर, २०१६ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील इयत्ता १ ली ते ८ वीच्या वर्गात शिक्षण घेणाऱ्या सर्व विनाअनुदानित विद्यार्थ्यांना पोषण आहार देण्याबाबत शासनाने केंद्र शासनाकडे केलेली विनंती केंद्राकडून अमान्य करण्यात आली, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, दुष्काळाची वाढती व्याप्ती, अवर्षण इत्यादी बाबी विचारात घेता मानवतेच्यादृष्टीकोनातून अनुदानित, विनाअनुदानित असा कोणताही भेद न करता सर्व मुलांना सरसकट पोषण आहार मिळण्याच्या अनुषंगाने राज्य शासनाकडून केंद्र शासनाकडे फेरविनंती करण्यात आली आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, राज्य शासनाकडून करण्यात आलेल्या फेरविनंतीस अनुसरून केंद्र शासनाकडून कोणता निर्णय घेण्यात आला तसेच राज्य शासनाच्यावतीने याबाबत कोणता पाठपुरावा वा प्रयत्न करण्यात आले वा येत आहे,
(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन दुष्काळी, अवर्षण पिडीत भागातील विद्यार्थ्यांना पोषण आहार मिळण्याच्यादृष्टीने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (१२-०२-२०१८) :** (१) हे खरे आहे.
(२) व (३) शासनामार्फत दरवर्षी वार्षिक कार्ययोजना व अंदाजपत्रक (AWP & B) बाबत केंद्र शासनाकडे आयोजित बैठकीमध्ये विनाअनुदानित शाळांमधील आणि अनुदानित शाळांमधील विनाअनुदानित तुकडयांमधील शिकत असणारे इ.१ ली ते ८ वी पर्यंतचे विद्यार्थी यांना शालेय पोषण आहार योजनेचा लाभ देण्याबाबत प्रतिवर्षी विनंती करण्यात येते. तथापि, केंद्र शासनामार्फत सदर विनंती नाकारण्यात येते.
(४) दुष्काळग्रस्त / टंचाईसदृश भागातील पात्र विद्यार्थ्यांना शालेय पोषण आहार योजनेंतर्गत नियमित आहारासोबत आठवडयातून ३ दिवस दुध /अंडी/ इतर पौष्टीक आहार देण्यात येत आहे.
(५) प्रश्न उद्भवत नाही.

___

**मौजे देवडे-वाडीअधिष्ठी (ता.संगमेश्वर, जि.रत्नागिरी) येथे डोंगरी विकास कार्यक्रमांतर्गत पथदिवे निकृष्ट दर्जाचे असल्याबाबत**

**(३०) ३३४१४ (११-०८-२०१७). श्री.प्रविण दरेकर :** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मौजे देवडे-वाडी अधिष्ठी (ता.संगमेश्वर, जि.रत्नागिरी) येथे डोंगरी विकास कार्यक्रमांतर्गत बालाजी इंटरप्रायजेस या कंपनीकडून बसविण्यात आलेले पथदिवे हे अत्यंत निकृष्ट दर्जाचे असल्यामुळे सुरु केल्यावर बंद पडल्याचे निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) तसेच सदरचे पथदिवे लावल्यानंतर सहा महिन्याची देखभाल दुरुस्तीची जबाबदारी संबधित कंपनीवर असूनही कंपनीने पथदिव्यांची दुरुस्ती केली नाही, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, याबाबत कृषी विकास अधिकारी, जिल्हा परिषद, रत्नागिरी यांना ग्रुप ग्रामपंचायत, देवडे यांनी माहे सप्टेंबर, २०१६ पासून ते मे, २०१७ पर्यंत निवेदने दिलेली आहेत, हे खरे आहे काय,

(४) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन निवेदनाच्या अनुषंगाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (१२-०२-२०१८) :** (१) नाही.

(२), (३) व (४) बालाजी इंटरप्रायझेस, जी-६, कुबेर ॲव्हेन्यू, सेवाहिल, जालना रोड, औरंगाबाद यांनी मौजे देवडे-वाडी अधिष्ठी येथे ७७ सौरपथ दिवे दिनांक २२/०३/२०१६ रोजी अस्थापित केले. सदर पथदिव्यापैकी २ पथदिवे नादुरूस्त असल्याचे ग्रुप ग्रामपंचायत देवडे-वाडी अधिष्ठी यांनी दिनांक ३१/०५/२०१६ रोजी व ६० पथदिवे नादुरूस्त असल्याचे दिनांक ०२/०५/२०१७ रोजी जिल्हा परिषद, रत्नागिरी यांना कळविले. त्यानुसार जिल्हा परिषद, रत्नागिरी यांनी दिनांक ३१/०५/२०१७, दिनांक ०७/०६/२०१७ व दिनांक ३०/०६/२०१७ चे पत्रान्वये पथदिवे दुरूस्ती करून त्याबाबतचा अहवाल सादर करणेबाबत बालाजी इंटरप्रायझेस यांना कळविलेले आहे. त्यानुसार बालाजी इंटरप्रायझेस कडून पथदिवे दुरूस्त करण्याची कार्यवाही सुरू आहे.

(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील पोलीस संख्येनुसार त्यांना निवासस्थाने उपलब्ध करुन देण्याबाबत

**(३१) ३३५६४ (११-०८-२०१७). श्री.विक्रम काळे, श्री.अमरसिंह पंडित : तारांकित प्रश्न क्रमांक २५५९३ ला दिनांक ७ डिसेंबर, २०१६ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील पोलीस संख्येनुसार त्यांना निवासस्थाने उपलब्ध करुन देण्यासाठी शासनाने जिल्हानिहाय बृहत आराखडा तयार केला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदरील बृहत आराखडयाचे स्वरुप काय आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०५-०२-२०१८) :** (१) होय, हे खरे आहे.

(२) या बृहत आराखडयानुसार पहिल्या टप्प्यात २१९८२ दुसऱ्या टप्प्यात १७७८५ व तिसऱ्या टप्प्यात ६८७४ अशा एकूण ४६६४१ निवासस्थानांच्या बांधकामाचे नियोजन करण्यात येत आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## अकोला जिल्हा परिषदेतील वर्ग १ व वर्ग २ ची रिक्त पदे भरण्याबाबत

**(३२) ३३६६३ (१८-०८-२०१७). श्री.गोपिकिशन बाजोरीया :** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) अकोला जिल्हा परिषदेतील वर्ग १ ची मंजूर पदे ६५ असूनही फक्त ५५ पदे भरण्यात येऊन अदयापी १० पदे रिक्त आहेत तर वर्ग-२ ची मंजूर पदे १८८ असून १२३ पदे भरलेली आहेत व ६५ पदे रिक्त अशी एकूण ७५ पदे रिक्त असल्याचे माहे मे, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त पदे रिक्त राहण्याची कारणे काय आहे,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन सदर पदे तात्काळ भरण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (०९-०२-२०१८) :** (१) व (२) अकोला जिल्हा परिषदेतील वर्ग-१ मधील ६५ मंजूर पदापैकी ८ पदे रिक्त असून वर्ग-२ मधील १८८ मंजूर पदापैकी ६० पदे रिक्त आहेत. प्रस्तुत पदे मुख्यत्वेकरुन पदोन्नती व बदलीमुळे रिक्त झालेली आहेत.
(३) जिल्हा परिषदेतील वर्ग-१ व वर्ग-२ मधील विविध विभागातील रिक्त पदे तातडीने भरण्याबाबत या विभागाकडून सर्व संबंधित प्रशासकीय विभागांना योग्य ती कार्यवाही करण्याबाबत दिनांक २२/०७/२०१६ व २२/१२/२०१७ च्या पत्रान्वये कळविण्यात आले आहे.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## नवी मुंबईतील अनधिकृत पेट्रोलपंपावर कारवाई करणेबाबत

**(३३) ३३७७२ (११-०८-२०१७). श्री.सुजितसिंह ठाकूर :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) नवी मुंबई महापालिकेचा व्यवसाय परवाना अथवा भोगवटा प्रमाणपत्र नसताना देखील शहरातील जवळपास आठ पेट्रोलपंप कित्येक वर्ष सर्रासपणे सुरु असल्याचे माहे मे, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त अनधिकृतपणे सुरु असलेल्या पेट्रोलपंपावर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (३०-०१-२०१८) :** (१) हे खरे नाही.
नवी मुंबईतील अनधिकृत पेट्रोलपंपावर कारवाई करण्यासंदर्भात कोणतेही गुन्हे/तक्रारी दाखल नाहीत.
(२) गुन्हे/तक्रारी दाखल नसल्याने कार्यवाही करण्यात आली नाही.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**राज्यातील कनिष्ठ महाविद्यालयातील व्दिलक्षी व्यावसायिक अभ्यासक्रमांतर्गत कार्यरत शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना कालबध्द पदोन्नती मिळण्याबाबत**

**(३४) ३४१८४ (१८-०८-२०१७). श्री.श्रीकांत देशपांडे, श्री.दत्तात्रय सावंत :** सन्माननीय **कौशल्य विकास व उद्योजकता मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील कनिष्ठ महाविद्यालयातील व्दिलक्षी व्यावसायिक अभ्यासक्रमांतर्गत कार्यरत शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना दिनांक ०१ ऑक्टोबर, १९९४ पासून कालबध्द पदोन्नती मिळण्याबाबत मागणी होत आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, कनिष्ठ महाविद्यालयांतर्गत इयत्ता ११ वी व १२ वी ला संलग्न (जोडून) असलेल्या वैकल्पिक विषय म्हणून बऱ्याच ठिकाणी व्दिलक्षी अभ्यासक्रम हा सन १९७८ पासून राबविण्यात येत आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, व्दिलक्षी व्यावसायिक अभ्यासक्रमांतर्गत कार्यरत/शिक्षक/ निदेशक/शिक्षकेतर कर्मचारी यांना माध्यमिक किंवा कनिष्ठ महाविद्यालयातील कार्यरत शिक्षक/शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांप्रमाणे, शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्र. एन.सी.जी./१७९४/१८०९/(२९७६)/ वि.शि. ४, दिनांक २३/०३/१९९८ नुसार कालबद्ध पदोन्नती (वरिष्ठश्रेणी) मंजूर करण्यात आली, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कालबद्ध पदोन्नतीचा लाभ दिनांक ०१ ऑक्टोबर, १९९४ पासून देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.संभाजी पाटील-निलंगेकर (०१-०२-२०१८) :** (१) होय, हे खरे आहे.

(२) होय, हे खरे आहे.

(३) हे खरे नाही, राज्यातील अशासकीय अनुदानित तंत्र माध्यमिक शाळेतील शिक्षक/शिक्षकेतर तसेच +२ स्तरावरील अशासकीय अनुदानित व्दिलक्षी व किमान कौशल्यावर आधारीत व्यवसाय अभ्यासक्रमातील शिक्षकेतर

कर्मचाऱ्यांना कालबध्द पदोन्नती योजना उच्च व तंत्र शिक्षण विभागाचा शासन निर्णय क्र.टिएसए- १००२/२७३७/व्यशि-४, दिनांक १२/७/२००४ अन्वये मंजूर करण्यात आली आहे. महाराष्ट्र राज्यातील व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण विभागाच्या अंतर्गत येणाऱ्या प्रादेशिक कार्यालयांतर्गत अशासकीय अनुदानित तंत्र माध्यमिक शाळा तसेच +२ स्तरावरील अनुदानित संस्थातील व्दिलक्षी व किमान कौशल्यावर आधारीत व्यवसाय अभ्यासक्रमाकडील गट क व गट ड च्या कर्मचाऱ्यांना १२ वर्षाच्या नियमित सेवेनंतर त्यांच्या पदोन्नती साखळीतील पदावर पदोन्नतीसाठी पद अस्तितवात नाही अशा सर्व कर्मचाऱ्यांना कालबध्द पदोन्नती मंजूर करण्यात आली आहे. सदरची योजना ही १ जून, २००४ पासून अंमलात आलेली असल्यामुळे या दिनांकापासून सदरच्या कर्मचाऱ्यांना या योजनेचा लाभ देण्यात आलेला आहे.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही

(५) प्रश्न उद्‌भवत नाही

---

**मुंबई महानगरपालिका कार्यक्षेत्रातील खाजगी शाळांना मान्यता देण्याबाबत**

**(३५) ३४२४० (१८-०८-२०१७). श्री.श्रीकांत देशपांडे, श्री.दत्तात्रय सावंत :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबई महानगरपालिका कार्यक्षेत्रातील खाजगी शाळांना मान्यता देण्याचे प्रस्ताव प्रलंबित आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, बालकांचा मोफत व सक्तीच्या शिक्षणाचा हक्क नियम २०११ नियम - ११४ नुसार तपासणीनंतर १५ दिवसाचे आत नमुना २ मध्ये मान्यता पत्र देण्याची तरतुद असून शिक्षणाधिकारी यांनी मागील ६ वर्षापासून आर.टी.ई. मधील उपरोक्त तरतुदीस मान्यता प्रलंबित ठेवली, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, मागील ६ वर्षापासून प्रलंबित असलेले प्रस्ताव केव्हा मंजूर होतील,

(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन प्रलंबित प्रस्तावास मान्यता देण्याबाबत कार्यवाही करुन शिक्षणाधिकारी व त्यांचे अधिनस्त अधिकाऱ्यांविरुध्द कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०१-०२-२०१८) :** (१) बालकांचा मोफत व सक्तीच्या शिक्षणाचा हक्क अधिनियम, २००९ मधील मानके व प्रमाणके तसेच अनुदान सहाय्य संहितेतील अटी व शर्तींची पुर्तता न केल्यामुळे, बृहन्मुंबई महानगपालिका परिक्षेत्रातील मान्यताप्राप्त खाजगी प्राथमिक अनुदानित ४१८ शाळांपैकी ४२ शाळा व खाजगी प्राथमिक विनाअनुदानित ६९५ शाळांपैकी ४९४ शाळांच्या मान्यता मुदतवाढ देण्याचे प्रस्ताव प्रलंबित आहेत ही वस्तुस्थिती आहे.

(२), (३), (४) व (५) बालकांचा मोफत व सक्तीच्या शिक्षणाचा हक्क नियम, २०११ नियम-११४ नुसार तपासणीनंतर १५ दिवसांचे आत नमुना-२ मध्ये मान्यता प्रत्र देण्याची तरतूद आहे ही वस्तुस्थिती आहे.

सदर शाळांनी बालकांचा मोफत व सक्तीच्या शिक्षणाचा हक्क अधिनियम, २००९ मधील मानके व प्रमाणके तसेच अनुदान सहाय्य संहितेतील अटी व शर्तींचे पुर्तता केल्यानंतर सदर शाळांच्या मान्यतेबाबतचे प्रस्ताव बृहन्मुंबई महानगरपालिकेमार्फत मंजुर करण्यात येतील.

---

## पुणे जिल्हयामधील रुग्णालयांमध्ये सफाई कामगारांच्या अनुकंपा तत्वावरील भरतीच्या मागणीबाबत

**(३६) ३४३८७ (१८-०८-२०१७). श्री.अनिल भोसले :** सन्माननीय **सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) पुणे जिल्हयातील शासनाच्या अखत्यारीत असलेल्या रुग्णालयातील सफाई कामगारांच्या अनुकंपा तत्वावरील भरतीच्या मागणीबाबत अनेक वर्षापासून शासनाने कार्यवाही केली नसल्याचे माहे मे, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व तद्नुसार सफाई कामगारांच्या प्रलंबित अनुकंपा तत्वावरील भरतीच्या मागणीबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**डॉ. दीपक सावंत (०१-०१-२०१८) :** (१) हे खरे नाही.
(२) प्रश्न उद्‌भवत नाही.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## मुलुंड (पूर्व), मुंबई येथील टाटा कॉलनीतील यशश्री को-ऑप.हौसिंग सोसायटीच्या पुनर्विकासाबाबत

**(३७) ३४५९० (१८-०८-२०१७). प्रा.जोगेन्द्र कवाडे :** सन्माननीय **गृहनिर्माण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मुलुंड (पूर्व), मुंबई येथील टाटा कॉलनीतील यशश्री को-ऑप.हौसिंग सोसायटी ही इमारत सिरोया एफएम या विकासकाने गेल्या १०-१२ वर्षापूर्वी पुनर्विकासाकरिता ताब्यात घेतली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, या इमारतीचे ४ माळ्यांपर्यंत सांगाडा (स्ट्रक्चर) उभे करण्यापलिकडे कोणतेही कामे उक्त विकासकाने केलेली नाहीत, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, इमारतीतील रहिवाशांना गेल्या ३-४ वर्षापासून घरभाडे दिलेले नाही तसेच याबाबत चौकशी करण्यास गेलेल्या सदनिकाधारकांना अर्वाच्या भाषेत उत्तर देण्यात येते आहे, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, या विकासकावर शासनामार्फत कारवाई करून उक्त संस्थेच्या सभासदांना त्यांच्या सदनिका त्वरीत बांधून देण्याच्यादृष्टीने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.प्रकाश महेता (२०-०१-२०१८) :** (१) मुख्य अधिकारी, मुंबई गृहनिर्माण व क्षेत्रविकास मंडळ यांचेकडून प्राप्त अहवालानुसार मौजे नवघर, मुलुंड येथील नवघर यशश्री को. ऑप. हौसिंग सोसायटी या संस्थेने विकास करारनाम्याव्दारे पुनर्विकासासाठी मे. सिरोया एफएम कंन्स्ट्रक्शन प्रा. लि. या विकासकाची नेमणूक केली आहे. सदर संस्थेने उपरोक्त विकासकाबरोबर दिनांक २९/०४/२००८ रोजी करारनामा केला आहे.

(२) मे. सिरोया एफएम कंन्स्ट्रक्शन प्रा. लि. या विकासकाने संस्थेच्या पुनर्विकासाचे काम सुरु केलेले असून प्रत्यक्ष जागेवर ४ माळ्यापर्यंतचे आर.सी.सी. बांधकाम पूर्ण झाले असून गेल्या काही वर्षापासून काम बंद आहे.

(३) व (४) संस्थेने अथवा संस्थेच्या सभासदांनी विकासक भाडे देत नाही याबाबत तसेच संस्थेच्या इमारतींच्या पुनर्विकासाचे काम बंद असल्याबाबत देखील म्हाडाकडे तक्रार केलेली नाही, असे म्हाडाच्या अहवालात नमूद करण्यात आले आहे.

(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यातील दुष्काळग्रस्त जिल्हयासाठी केंद्र शासनाकडे विशेष पॅकेजची मागणी करण्याबाबत

**(३८) ३५०७२ (०२-०१-२०१८). श्री.अमरसिंह पंडित, श्री.धनंजय मुंडे, श्री.सतिश चव्हाण, श्री.जयवंतराव जाधव, श्री.विक्रम काळे, श्री.नरेंद्र पाटील, डॉ.अपूर्व हिरे, प्रा.अनिल सोले : तारांकित प्रश्न क्रमांक ३१३१२ ला दिनांक २८ जुलै, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **जलसंपदा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील दुष्काळग्रस्त जिल्हयातील प्रकल्प / प्रकल्प घटक पुर्ण करण्याकरिता निधी उपलब्ध करून देण्यासाठी राज्य शासनाकडून केंद्र शासनाकडे प्रस्ताव सादर करण्यात आला, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, केंद्र शासनाकडून महाराष्ट्रातील अवर्षण प्रवण जिल्हयातील कामांसाठी राज्य शासनास निधी उपलब्ध करून देण्यात आला आहे काय,

(३) असल्यास, केंद्र शासनाकडून किती निधी उपलब्ध करून देण्यात आला आहे,

(४) नसल्यास, प्रस्तुत प्रयोजनास्तव निधी उपलब्ध व्हावा म्हणून राज्य शासनाकडून कोणता पाठपुरावा करण्यात आला वा येत आहे,

(५) तसेच दुष्काळग्रस्त जिल्ह्यासाठी विशेष पॅकेजमध्ये मराठवाडा विभागातील बीड जिल्ह्यातील किती प्रकल्पांचा समावेश आहे व उक्त पॅकेज कधी मंजूर होणार आहे,
(६) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.गिरीष महाजन (३१-०१-२०१८) :** (१) होय. राज्यातील आत्महत्याग्रस्त जिल्ह्यातील १०४ प्रकल्प व दुष्काळग्रस्त भागातील ८ प्रकल्प पूर्ण करणेसाठी केंद्र शासनाने अर्थसहाय्य उपलब्ध करुन द्यावे यासाठी राज्य शासनाकडून केंद्र शासनाकडे प्रस्ताव सादर करण्यात आला आहे.
(२) व (३) सदर प्रस्तावित पॅकेज अंतर्गत केंद्र शासनाकडून अद्याप निधी उपलब्ध झालेला नाही.
(४) त्यासाठी मुख्यमंत्री व जलसंपदा मंत्री यांनी या प्रकल्पांना निधी मिळणेसाठी मा.पंतप्रधान कार्यालय व मा.वित्त मंत्री, भारत सरकार यांना पत्राने तसेच प्रत्यक्ष भेट घेऊन विनंती केली आहे. सदर प्रस्तावाच्या अनुषंगाने मा.पंतप्रधानांचे प्रधान सचिव यांचेकडे दिनांक १४/११/२०१७ रोजी बैठक आयोजित करण्यात आली होती. या बैठकीमध्ये सदर प्रकल्पांना २५% केंद्रीय अर्थसहाय्य उपलब्ध करुन देण्यास तत्वत: मान्यता देण्यात आली. त्याप्रमाणे सुधारित प्रस्ताव केंद्र शासनास सादर करण्यात आला आहे.
(५) सदर आत्महत्याग्रस्त जिल्ह्यातील व दुष्काळग्रस्त भागातील प्रकल्प पूर्तीसाठीच्या पॅकेजच्या अनुषंगाने दिनांक ०५/१२/२०१७ रोजी केंद्र शासनास पाठविलेल्या प्रस्तावात मराठवाड्यातील आत्महत्याग्रस्त जिल्ह्यातील १७ प्रकल्पांचा समावेश असून बीड जिल्ह्यातील सात्रापोत्रा साठवण तलावाचा समावेश आहे.
(६) प्रश्न उद्भवत नाही.

---

## कळगांव, दहिवली (ता.शहापूर) भागातील काळू नदीवरील पुलाची दुरूस्ती करण्याबाबत

**(३९) ३५३०३ (०३-०१-२०१८). श्री.रविंद्र फाटक : तारांकित प्रश्न क्रमांक ३१५८६ ला दिनांक २४ जुलै, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम वगळून) मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) शहापूर आणि मुरबाड (जि.ठाणे) या दोन्ही तालुक्यांना जोडणारा कळगांव, दहिवली (ता.शहापूर) विभागातील काळू नदीवरील पुल नादुरूस्त झाल्याने धोकादायक ठरवून तो वाहतुकीस बंद करून एक वर्षाचा कालावधी उलटूनही अद्यापि पुलाची दुरूस्ती करण्यात आली नसल्याचे माहे सप्टेंबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, नादुरूस्त पुलामुळे तालुक्यातील वाहतुकीस अडथळा होत आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने सदर पुलाची दुरूस्ती करण्याबाबत तसेच, पुलाच्या दुरूस्तीचे काम प्रलंबित ठेवणाऱ्या जबाबदार दोषींवर कारवाई करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (१४-०२-२०१८) :** (१) प्रश्नांकीत पुलाचे बांधकाम सन १९८१ मध्ये करण्यात आले आहे. पुलाच्या दुसऱ्या गाळयातील बॉक्स गर्डर क्षतिग्रस्त झाल्याचे तपासणीत दिसून आल्याने, माहे ऑक्टोबर, २०१६ पासून पुल वाहतुकीसाठी बंद करण्यात आला आहे. पुलावरील वाहतुक अन्य उपलब्ध पर्यायी मार्गाने सुरु आहे.

(२), (३) व (४) पुलाचे संरचनात्मक परिक्षण (Structural Audit) करण्यात आले आहे, या अहवालातील निष्कर्षाचा अभ्यास करुन, पुलाची दुरुस्ती करण्यासाठी करावयाच्या कामाचा सविस्तर तपशील व योजना अंतिम करण्याची कार्यवाही संकल्पचित्र मंडळामार्फत प्रगतीत आहे. तपशील प्राप्त करुन घेऊन पुलाच्या दुरुस्तीचे काम मंजूरी, निधी, निकष व प्राधान्यक्रमानुसार हाती घेण्याचे नियोजन आहे.

___

**परभणी महानगरपालिकेच्यावतीने करण्यात आलेली अवाजवी करवाढ रद्द करणेबाबत**

**(४०) ३५४१५ (०४-०१-२०१८). श्री.अब्दुल्लाखान दुर्राणी, श्री.धनंजय मुंडे, श्री.सतिश चव्हाण, श्री.अमरसिंह पंडित :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) परभणी शहरातील नागरिकांनी १८ वर्षे प्रलंबित ठेवलेली करवाढ अचानकपणे लागू करणे, सुमारे १० ते ११ पटीने कर वाढविणे, चुकीचे मुल्यांकन करणे व इतर प्रकार करून शहरवासियांना वेठीस धरणाऱ्या महानगरपालिकेच्या कारभाराविरूध्द जिल्हाधिकारी व महानगरपालिका आयुक्त, परभणी यांच्याकडे सन २०१७ मध्ये वा त्यादरम्यान लेखी आक्षेप नोंदविले आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, दिनांक १६ सप्टेंबर, २००० रोजीच्या नगरविकास विभागाच्या परिपत्रकानुसार पुनर्मुल्यांकन, करवाढ याबाबत स्पष्ट सूचना असतानाही महानगरपालिका आयुक्त, परभणी यांनी सुमारे १० ते १२ पटीने अवाजवी करवाढीच्या नोटीसा जारी केल्या आहेत, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, महानगरपालिकेच्यावतीने करण्यात आलेली अवाजवी करवाढ, इतर दरवाढ रद्द करून नागरिकांना न्याय देण्यासाठी शासनस्तरावरून कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२९-०१-२०१८) :** (१) हे खरे आहे.

(२) परभणी शहरातील मालमत्तांची कर आकारणी सन १९९९-२००० मध्ये करण्यात आली होती. आर्थिक सुधारणांची बाब म्हणून आता परभणी महानगरपालिकेंतर्गत मालमत्तेचे पुनर्मुल्यांकन करण्याची प्रक्रिया सुरु आहे.

(३) परभणी शहर महानगरपालिका हद्दीतील सर्व मालमत्तांचे सर्वेक्षण करुन, तसेच मोजमापे व इमारतींचा वापर याबाबतची सर्व माहिती संकलित करण्यात आली आहे.

त्यानंतर कर योग्य मुल्य निश्चित करुन मालमत्ताधारकांना कर आकारणीच्या नोटीसा बजावण्यात आल्या आहेत.

याबाबत उपस्थित झालेल्या आक्षेपांची सुनावणी घेऊन व संबंधितांना योग्य संधी देवून मालमत्ता करामध्ये सुधारणा करण्याची कार्यवाही परभणी शहर महानगरपालिकेमार्फत करण्यात येत आहे.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## परभणी शहरातील शासकीय जमिनीवरील अतिक्रमणे निष्कासित करण्याबाबत

**(४१) ३५४५३ (०३-०१-२०१८). श्री.अब्दुल्लाखान दुर्राणी, श्री.धनंजय मुंडे, श्री.सतिश चव्हाण, श्री.अमरसिंह पंडित : तारांकित प्रश्न क्रमांक ३३८९१ ला दिनांक ७ ऑगस्ट, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) परभणी (जि.परभणी) शहरातील मध्यवस्तीत असणाऱ्या सर्व्हे नं. ३१५ ते ३३० मधील जवळपास ७५ एकर शासकीय जमीन बेकायदेशीररित्या हस्तांतरीत झाल्यावरून मा.उच्च न्यायालयाने जिल्हाधिकारी, परभणी यांना सुनावणी व पुढील प्रकिया करण्याबाबत सन २०१६ मध्ये वा त्यादरम्यान आदेशीत केले होते, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, जिल्हाधिकारी, परभणी यांनी विहित मुदतीत सुनावणीची प्रक्रिया पुर्ण केली आहे काय, तसेच कोणती अंतिम कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने सदर अतिक्रमण निष्कासित करून हटवून शासकीय जागा ताब्यात घेण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (१५-०२-२०१८) :** (१) होय, हे खरे आहे.
(२) व (३) परभणी शहरातील स.नं. ३१५ ते ३१७, ३२५ ते ३२७, आणि ३३० मधील जमिनीच्या गा.न.नं. ७/१२ मध्ये भोगवटादार सदरी "महाराष्ट्र शासन-बलदीया सरकार" अशी नोंद घेण्याबाबत आणि स.नं. ३१८ ते ३२४, ३२८ व

३२९ या जमिनीवरील खाजगी व्यक्तींची नावे कमी करुन "महाराष्ट्र शासन-महसूल विभाग" अशी नोंद घेण्याबाबत जिल्हाधिकारी, परभणी यांनी दिनांक २२/०१/२०१६ रोजी आदेश पारीत केले होते.

सदर आदेशाच्या विरोधात पटेल कत्रुवार ॲण्ड कंपनी यांनी मा.उच्च न्यायालय, औरंगाबाद खंडपीठ येथे रिट याचिका क्र.१३३८/२०१६ अन्वये प्रकरण दाखल केले होते. उक्त रिट याचिकेमध्ये याचिकाकर्त्यास म्हणणे दाखल केले होते. उक्त रिट याचिकेमध्ये याचिकाकर्त्यास म्हणणे सादर करण्याची पुरेशी संधी देऊन त्यानुसार सुनावणीतील सर्व मुद्दे विचारात घेऊन उचित निर्णय घेण्यात येईल, असे शासकीय अभियोक्ता मा.उच्च न्यायालय औरंगाबाद यांच्यामार्फत मा.उच्च न्यायालयात म्हणणे सादर केले होते. सदर म्हणणे विचारात घेऊन मा.उच्च न्यायालयाने सदर याचिका निकाली काढली. त्यानुसार परभणी जिल्हाधिकारी कार्यालयामार्फत प्रकरणातील संबंधितांना म्हणणे सादर करण्याची संधी देऊन सुनावणीची प्रक्रिया पूर्ण करुन जिल्हाधिकारी परभणी यांनी दिनांक ३०/०३/२०१७ रोजी आदेश निर्गमित केलेले आहेत. सदर आदेशानुसार वादातील जमिनीबाबत जिल्हाधिकारी कार्यालयाचे दिनांक २२/०१/२०१६ रोजीचे आदेश संपुष्ठात आले आहेत. त्यामुळे सदर जमिनीवरील अतिक्रमण हटवून जागा ताब्यात घेण्याची कार्यवाही करण्यात आलेली नाही. सदर दिनांक ३०/०३/२०१७ रोजीच्या आदेशाविरुध्द अप्पर आयुक्त, विभागीय कार्यालय, औरंगाबाद यांचे न्यायालयात अपील दाखल करण्यात आलेले असून ते प्रलंबित आहे.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यातील पशुसंवर्धन विभागाकडून आदिवासी, अनुसूचित जाती-जमातीतील शेतकऱ्यांना म्हाताऱ्या व भाकड गाई-म्हशींचे वाटप करण्यात आल्याबाबत

**(४२) ३५५९६ (०३-०१-२०१८). श्री.जयंत पाटील, श्री.बाळाराम पाटील :** सन्माननीय **पशुसंवर्धन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय:-

(१) राज्याच्या पशुसंवर्धन विभागाकडून सन २००१ पासून आदिवासी, अनुसूचित जाती-जमातीतील शेतकऱ्यांना रोजगारासाठी विशेष घटक योजनेंतर्गत गाई-म्हशी वाटप करण्यात येत असून सन २०१६ पर्यंत २ हजार ३७२ गाई-म्हशींचे वाटप करण्यात आलेले असून या योजनेसाठी आतापर्यंत रूपये ११ कोटींचा निधी खर्च करण्यात आलेला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर योजनेंतर्गत वाटप करण्यात आलेल्या गाई-म्हशी या ५ ते ७ वर्षे वयाच्या असल्याने त्यांची दूध देण्याची क्षमता घटत होती तर काही गाई-म्हशी म्हाताऱ्या व भाकड होत्या, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, सदर योजनेची कॅगने माहे जुलै, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान तपासणी केली असता यामध्ये अनेक गैरव्यवहार झाले असल्याच्या बाबी निदर्शनास आल्या आहेत, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने उक्त प्रकरणी दोषींवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.महादेव जानकर (०८-०२-२०१८)** : (१) सदर योजनेंतर्गत सन २००१ ते २०१६ पर्यंत राज्यात एकूण ७३२८० दुधाळ जनावरांचे (गाई व म्हशी) वाटप करण्यात आलेले असून त्यासाठी रुपये १४१.१२ कोटी निधी खर्च करण्यात आलेला आहे.

(२) सदर योजनेंतर्गत वाटप करण्यात आलेल्या गाई-म्हशी या ५ ते ७ वर्षे वयाच्या असल्याने, त्यांची दूध देण्याची क्षमता घटत आलेली आहे हे खरे नाही.

(३) सदर योजनेचे महालेखापाल यांनी माहे जुलै, २०१७ मध्ये आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे कार्यालय तसेच, नागपूर विभागातील ६ जिल्ह्यांचे सन २०११-१६ या कालावधीचे लेखापरिक्षण केलेले असून, लेखा परिक्षणामध्ये गैरव्यवहार झाला असल्याचे निदर्शनास आलेले नाही.

(४) व (५) प्रश्न उद्भवत नाही.

---

**केंद्र शासनाच्या पशुसंजीवनी योजनेंतर्गत जनावरांची ओळख पटवून देण्यासाठी जनावरांनाही युआयडी क्रमांकाचे बिल्ले देण्याबाबत**

**(४३) ३५८८० (०३-०१-२०१८). श्रीमती हुस्नबानू खलिफे, श्री.शरद रणपिसे, श्री.संजय दत्त, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.रामहरी रुपनवर, श्री.आनंदराव पाटील** : सन्माननीय **पशुसंवर्धन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) केंद्र शासनाच्या पशुसंजीवनी योजनेंतर्गत जनावरांची ओळख पटवून त्याची प्रजनन बाबतची माहिती ऑनलाईन करण्यासाठी आधारकार्डप्रमाणे जनावरांनाही युआयडी क्रमांक मिळणार आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, यासाठी रत्नागिरी जिल्ह्यातील १५ हजार ५३१ जनावरांना पहिल्या टप्प्यात १२ अंकी युआयडी नंबरचे बिल्ले उपलब्ध करुन देण्यात आले आहेत, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, सदर योजनेचे काम अतिशय संथगतीने सुरु असून आतापर्यंत फक्त १ हजार ७७४ जनावरांना टॅग लावण्यात आले आहेत, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने सदर योजनेला गती देवून व नियोजन करुन निर्धारित वेळेत सर्व जनावरांना युआयडी क्रमांक देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.महादेव जानकर (०८-०२-२०१८) :** (१) होय.

(२) व (३) रत्नागिरी जिल्ह्यासाठी एकूण २३९०० इअर टॅग्स उपलब्ध करून देण्यात आलेले आहेत.

दिनांक ३१/१२/२०१७ अखेर रत्नागिरी जिल्ह्यात एकूण ८१०८ जनावरांना टॅग्स लावण्यात आलेले आहेत.

(४) व (५) सदर योजनेंतर्गत टॅग्स व आवश्यक साहित्य खरेदी करण्यासाठी रुपये २००.०० लक्ष निधी पुरवणी मागणीद्वारे अर्थसंकल्पित करण्यात आलेला असून या निधीमधून आवश्यक ते इअर टॅग्स खरेदी करून जनावरांना युआयडी क्रमांक देण्याची कार्यवाही करण्यात येत आहे.

---

## तुमसर (जि.भंडारा) येथील विद्यार्थांना पुस्तके देण्याबाबत

**(४४) ३६०३४ (०२-०१-२०१८). श्री.परिणय फुके :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) तुमसर (जि.भंडारा) येथील जिल्हा परिषद व नगर परिषदेच्या शाळेच्या विद्यार्थांना अर्धे सत्र उलटूनही पुस्तकेच मिळाली नसल्याचे माहे ऑगस्ट, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन विद्यार्थ्यांना पुस्तके देण्याबाबत कार्यवाही करुन विद्यार्थ्यांच्या भविष्याशी खेळणाऱ्या अधिकाऱ्यांवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (१२-०२-२०१८) :** (१) अंशत: खरे आहे.

(२) प्रशासकीय कारणास्तव पाठयपुस्तकांच्या अतिरिक्त मागणीमुळे काही विद्यार्थ्यांना विलंबाने पाठयपुस्तके उपलब्ध करुन देण्यात आलेली आहेत.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## औषध निर्माण अधिकारी यांना महाराष्ट्र विकास सेवा गट "ब" मध्ये पदोन्नतीचा कोटा विभागून देण्याबाबत

**(४५) ३६१०९ (०२-०१-२०१८). श्री.जयवंतराव जाधव, श्री.अमरसिंह पंडित, श्री.धनंजय मुंडे, श्री.नरेंद्र पाटील :** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) जिल्हा परिषदेमधील जिल्हा तांत्रिक सेवा वर्ग ३ मधील औषध निर्माण अधिकारी यांना महाराष्ट्र विकास सेवा गट "ब" मध्ये पदोन्नतीचा कोटा विभागून देण्याबाबत लोकप्रतिनिधींनी दिनांक २ ऑगस्ट, २०१७ रोजी वा त्यासुमारास मागणी केली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (१६-०२-२०१८) :** (१) होय.
(२) म.वि.से.गट-ब मध्ये पदोन्नती देण्यासाठी जि.प.च्या निम्न संवर्गांना कोटा निश्चित करण्यास्तव संवर्गाचे संख्याबळ, पदोन्नतीचे उपलब्ध मार्ग, ग्राम विकासातील योगदान इ. बाबी विचारात घेऊन दिनांक ९/१/२०१४ रोजी अधिसूचना निर्गमित करण्यात आली आहे. त्यानुसार जिल्हा सेवा व तांत्रिक सेवा वर्ग-३ मधील आरोग्य संवर्गातील पर्यवेक्षक या वरिष्ठ पदास ५% कोटा विहित करण्यात आला आहे. जि.प. मध्ये आरोग्य विभागात “औषध निर्माता” हे पद असून “औषध निर्माण अधिकारी” हे पद अस्तित्वात नाही. हे पद एकाकी आहे. सदर पदाचे कामकाज प्राथमिक आरोग्य केंद्राशी संबंधित आहे. ही वस्तुस्थिती विचारात घेता सदर पदावरील कर्मचाऱ्यांना म.वि.से. गट-ब मध्ये पदोन्नतीचा कोटा विभागून देण्याबाबतची विनंती मान्य करता येणार नाही.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यातील जातीनिहाय अधिकृत माहिती उपलब्ध करणेबाबत

**(४६) ३६५४१ (१०-०१-२०१८). श्री.प्रविण दरेकर :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्याच्या प्रशासनाकडे सद्य:स्थितीत जातीनिहाय अधिकृत माहिती उपलब्ध नसल्याचे माहे सप्टेंबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदर माहिती तातडीने उपलब्ध करुन देण्याच्या सूचना मुख्य सचिवांनी संबंधित खात्यांच्या प्रमुख अधिकाऱ्यांना दिल्या आहेत, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त माहिती सादर करण्यात आली आहे काय व त्याचे स्वरुप काय आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०३-०२-२०१८) :** (१), (२) व (३) राज्यात शासकीय कर्मचाऱ्यांची/अधिकाऱ्यांची नोंद जातनिहाय ठेवण्यात येत नसून प्रवर्गनिहाय ठेवण्यात येते. राज्यातील विविध संवर्गातील प्रवर्गनिहाय रिक्त पदे भरण्याची कार्यवाही संबंधित विभागामार्फत केली जाते व त्याची माहिती त्या त्या विभागाकडे उपलब्ध असते.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## विठ्ठल-रुक्मिणी देवस्थान व्यवस्थापन समिती, पंढरपूर यात वारकरी संप्रदायाचा प्रतिनिधी सहअध्यक्षपदी घेण्याबाबत

**(४७) ३६५६० (०४-०१-२०१८). प्रा.डॉ.तानाजी सावंत :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) विठ्ठल-रुक्मिणी देवस्थान व्यवस्थापन समिती, पंढरपूर यांचे विरोधात वारकरी संप्रदायाने केलेल्या आंदोलनामुळे वारकरी संप्रदायाचा प्रतिनिधी सहअध्यक्षपदी घेण्याचा महत्वपुर्ण निर्णय माहे ऑक्टोबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान घेण्यात आलेला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, या संप्रदायाच्या प्रतिनिधीला देण्यात आलेल्या सहअध्यक्षाला काही विशेष अधिकार देण्यात आलेले आहेत किंवा त्यांचे अधिकाराबाबत काही निकष ठरविण्यात आलेले आहेत, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, साधारणत: त्याचे स्वरुप काय आहे व किती कालावधीपर्यंत सहअध्यक्ष पदाची नियुक्ती करण्यात येईल,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२५-०१-२०१८) :** (१) होय, हे खरे आहे.

दिनांक ३० ऑक्टोबर, २०१७ रोजीच्या अध्यादेशाद्वारे सहअध्यक्ष हे पद निर्माण करण्यात आलेले आहे.

(२) होय, हे खरे आहे.

(३) दिनांक ३० ऑक्टोबर, २०१७ रोजीच्या अध्यादेशाद्वारे निर्माण करण्यात आलेल्या सह-अध्यक्ष या पदावरील व्यक्ती अध्यक्षाच्या अनुपस्थितीत अध्यक्ष म्हणून काम करतील. तसेच शासन विहित करील अशी अध्यक्षांची कामे करतील आणि कर्तव्ये पार पाडतील. सह-अध्यक्षाचा कालावधी हा गठीत करण्यात आलेल्या समितीच्या कालावधी इतकाच असून जेव्हा नवीन समिती गठीत होईल तेव्हा सह-अध्यक्ष या पदावर पुनश्च नियुक्ती करण्यात येईल. सह-अध्यक्षपदी नियुक्ती करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन आहे.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

**नाशिक येथील मस्जीद दुधाधारी वक्फ मालमत्ता मंडळाच्या ताब्यात घेण्याबाबत**

**(४८) ३६९३६ (०२-०१-२०१८). श्री.अब्दुल्लाखान दुर्राणी, श्री.धनंजय मुंडे, श्री.सतिश चव्हाण, श्री.अमरसिंह पंडित :** सन्माननीय **अल्पसंख्यांक विकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) नाशिक येथील वक्फ संस्था मस्जीद दुधाधारी (सर्वे नं. ९८० व ९८१) मोरवाडी ही संस्था बेकायदेशीररित्या हस्तांतरीत करण्याचा प्रकार केल्यावरून तत्कालीन मुख्य कार्यकारी अधिकारी श्रीमती पटेल यांना शासनाने सन २०१६-२०१७ दरम्यान निलंबित केले होते, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, बेकायदेशीररित्या हस्तांतरीत करण्यात आलेली सदरील मालमत्ता वक्फ मंडळाच्या पूर्व परवानगीशिवाय हस्तांतरीत झाली होती, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन सदरील मालमत्ता वक्फ मंडळाच्या ताब्यात घेण्याबाबत अल्पसंख्यांक विकास विभाग व मुख्य कार्यकारी अधिकारी वक्फ बोर्ड यांच्यास्तरावरून कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे, तसेच याबाबत थोडक्यात माहिती काय आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (१२-०२-२०१८) :** (१) अंशत: खरे आहे. मस्जिद दुदाधारी, कथडा ऊर्फ काजीपुरा, ता.जि.नाशिक या संस्थेच्या ताब्यातील सर्व्हे नं. ९८० व ९८१ मधील मालमत्ता वक्फ मालमत्ता म्हणून नोंद करण्यासंदर्भात करण्यात आलेला अर्ज श्रीमती नसीम बानो पटेल, तत्कालीन प्रभारी मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य वक्फ मंडळ यांनी दिनांक ०४/०२/२०१६ च्या आदेशान्वये नामंजूर केला आहे. श्रीमती पटेल यांनी प्रतिपक्षाशी हातमिळवणी करुन तसेच अधिकारबाहयरित्या दिनांक ०४/०२/२०१६ च्या आदेशान्वये सदर संस्थेचा अर्ज नामंजूर केला असल्याच्या शासनाकडे तक्रारी प्राप्त झालेल्या होत्या. प्राथमिक चौकशीत सदर तक्रारीत तथ्य असल्याचे सकृतदर्शनी दिसून आल्याने त्यांना महसूल व वन विभागाच्या दिनांक ०३/०३/२०१७ च्या आदेशान्वये शासन सेवेतून निलंबित केले होते. तथापि, मा.उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद यांनी दिनांक १५/०१/२०१८ च्या आदेशान्वये सदर निलंबन आदेश रद्द केले आहेत.

(२) श्रीमती नसीम पटेल यांनी वक्फ मंडळाची पूर्व परवानगी न घेता सदर अर्ज नामंजूर केला आहे.

(३) श्रीमती पटेल यांच्या दिनांक ०४/०२/२०१६ च्या आदेशाविरुध्द मस्जिद दुदाधारीच्यावतीने महाराष्ट्र राज्य वक्फ न्यायाधिकरण, औरंगाबाद येथे वक्फ अपिल क्र.१/२०१६ दाखल केलले असून सद्य:स्थितीत प्रकरण न्यायप्रविष्ठ आहे.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

**परभणी येथील नवीन नाटयगृहाच्या उभारणीबाबत**

**(४९) ३६९४२ (०४-०१-२०१८). श्री.अब्दुल्लाखान दुर्राणी, श्री.धनंजय मुंडे, श्री.सतिश चव्हाण, श्री.अमरसिंह पंडित :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) परभणी येथील नवीन नाटयगृह उभारणीसाठी राज्य शासनाने १० कोटी रूपयांचा निधी सन २०१६-१७ मध्ये वा त्यादरम्यान मंजूर केला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, जागेची उपलब्धता असतानाही सदरील काम वर्षाअखेरही पूर्ण होऊ शकले नाही, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उक्त नाटयगृहाच्या उभारणीबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे, तसेच किती कालावधीत काम पूर्ण करण्यात येणार आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०६-०२-२०१८) :** (१), (२) व (३) सन २०१७-१८ करीता शासन पत्र दिनांक १ नोव्हेंबर, २०१७ च्या अन्वये विशेष अनुदानातून सदर कामास रुपये १० कोटी मंजूर केल्याचे कळविण्यात आले आहे व त्याचा आवश्यक मंजूरीसह प्रस्ताव शासनास सादर करण्याच्या सूचना देण्यात आल्या आहेत.
(४) विलंब झालेला नाही.

---

## पोलिसांकरिता बुलेटप्रुफ जॅकेटस खरेदी करणेबाबत

**(५०) ३७६०३ (०४-०१-२०१८). श्री.प्रविण दरेकर, डॉ.अपूर्व हिरे, प्रा.अनिल सोले :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मुंबईवरील दहशतवादी हल्ल्याला ९ वर्षे पूर्ण होत आली तरी स्वसंरक्षणार्थ अत्यावश्यक असलेली बुलेटप्रुफ जॅकेट्स पोलिसांना उपलब्ध झालेली नसल्याचे माहे नोव्हेंबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, बुलेटप्रुफ जॅकेट खरेदीत गैरव्यवहार झाल्यानंतर नव्याने निविदा जारी करीत पाच हजार जॅकेट्स खरेदी करण्यात आली आहेत, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, त्यात काय आढळून आले व तदनुसार कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२६-०२-२०१८) :** (१), (२) व (३) सन २०११ मध्ये महाराष्ट्र पोलीस दलासाठी केंद्रीय राखीव पोलीस दल, नवी दिल्ली यांच्याकडून २००० नग बुलेट प्रतिरोधक जॅकेट्स खरेदी केलेले असून ते आवश्यकतेप्रमाणे विविध पोलीस घटकास वाटप करण्यात आले आहेत. तद्नंतर, पोलीस महासंचालक कार्यालयामार्फत नवीन बुलेट प्रुफ जॅकेट्स खरेदीसाठी निविदा प्रक्रिया पार पाडून ४६१४ नग जॅकेट्स पुरवठा करण्याचे आदेश देण्यात आले असून त्यापैकी बॅलेस्टीक चाचणीत पात्र ठरलेल्या ३१२२ नग जॅकेट्सचा संबंधित पोलीस घटकांना वाटप करण्यात आलेले आहेत.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

**विधान भवन :**
**मुंबई.**

**डॉ. अनंत कळसे**
**प्रधान सचिव,**
**महाराष्ट्र विधानपरिषद.**

मुद्रणपूर्व सर्व प्रकिया महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालयाच्या संगणक यंत्रणेवर करण्यात आली आहे.
मुद्रण: शासकीय मुद्रणालय, मुंबई.